श्रीमत्

# श्रीशंकराचार्य यांचें

# चरित्र

लेखक

[illegible] वासुदेव विष्णु कावि.

संशोधक

नरहर पं[illegible]रे.

[illegible]क १८५३

[किं]मत ६ आणे.

# अभिप्राय

**या पुस्तकास पुणें येथील आचार्यकुलाचे संस्थापक, ' आचार्य ' मासिक, व आचार्य वर्णाश्रमधर्म पाक्षिक पत्राचे विद्वान संपादक श्री. वे. शा. सं. शास्त्रसुधाकर विष्णुशास्त्री बापट यांनीं दिलेला अभिप्राय**

रा. वासुदेव विष्णु कवि यांनीं 'श्रीमत् आद्य शंकराचार्य यांचें चरित्र ' या नांवाचा एक गद्य—पद्यात्मक लहानसा प्रबंध लिहिला आहे. कांहीं वर्षांपूर्वी केरळकोकिळ मासिकाचे संपादक रा. आठल्ये यांनीं आचार्यांचें समग्र चरित्र मराठींत लिहून प्रसिद्ध केलें होतें, पण तें आतां दुर्लभ झालें आहे. त्यानंतर श्री. रा. रा. महादेव राजाराम बोडस, मुंबई, यांनीं आचार्यांच्या चरित्राविषयीं सविस्तर प्रबंध लिहिला आहे. पण तो सामान्य व श्रद्धाळू वाचकांच्या फारसा उपयोगी पडण्यासारखा नाहीं. कारण त्यांनीं तो आधुनिक चिकित्सकांच्या पद्धतीनें लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. पण या लहानशा प्रबंधांत रा. कवि यांनीं महाराष्ट्रांतील श्रद्धाळु आबालवृद्ध स्त्रीपुरुषांना आचार्यांच्या चरित्राचें संक्षिप्त ज्ञान व्हावें म्हणून हा यत्न केला आहे. माझ्या दृष्टीनें तो बराच चांगला झाला आहे. या अल्प ग्रंथाच्या वाचनानें सर्व वाचकांस आचार्यांच्या चरित्राचें व कार्याचें सामान्य ज्ञान होईल यांत संशय नाहीं. ग्रंथकार ही आपली कृति श्रीमत् जगद्गुरु श्रीशंकराचार्य ( श्री. शिरोळकरस्वामी ) यांचे चरणीं उत्सवप्रसंगीं अर्पण करणार आहेत, हा त्यांतल्यात्यांत विशेष आहे. श्रीआचार्यजयंतीच्या निमित्तानें रा. कवि यांनीं केलेल्या या अपेक्षित कार्याबद्दल मी त्यांचे मनापासून अभिनंदन करतों.

पुणें<br>चैत्र शु॥ १४ शके<br>१८५३

आचार्यभक्त<br>**विष्णुशास्त्री बापट,**<br>' संस्थापक, आचार्यकुल पुणें. '

# अर्पणपत्रिका.

शास्त्रं शारीरमीमांसा देवस्तु परमेश्वरः
आचार्याः शंकराचार्याः सन्तु जन्मनि जन्मनि ।

ज्या पुण्यप्रताप महात्म्याचें अवतारकार्य अति उज्वलतेनें सर्व अवनीतलावर पसरलें, आपल्या अलौकिक वेदभाष्यानें महान् महान् तत्वज्ञांस प्रमुदित केलें, निर्दोष व निश्चित वादपद्धतीनें अवैदिक वादप्रवर्तकांस शरण येणें भाग पाडलें, व अपौरुषेय अशा परमेश्वरप्रणीत वैदिक सनातन धर्माची पुनर्घटना करून चिरंजीव केलें, त्या श्रीआद्य भगवत् पूज्यपाद शंकराचार्यांच्या पीठसांप्रदायांतील संकेश्वर व करवीर या पीठांवर अधिष्ठित असलेले, प्रचलित श्रीमत् अभिनव श्रीसच्चिदानंद विद्यानरसिंहभारतीस्वामीमहाराज (श्रीशिरोळकर स्वामीमहाराज) शंकराचार्य यांचे चरणीं त्यांचे ठिकाणीं असलेल्या अनेक सद्गुणसमुच्चयास लुब्ध होऊन, हें श्रीमत् आद्य शंकराचार्यांचें अल्पसें गद्य-पद्य-रूपीं केलेलें पुस्तक आदरपूर्वक नम्रपणानें अर्पण करीत आहें.

आचार्यांचा शिष्य,

वासुदेव विष्णु कवि.



श्रीशंकराचार्य विद्यानृसिंह भारती स्वामीमहाराज

( श्रीशिरोळकर स्वामीमहाराज )

करून सोडणारें महादुर्घट काम केलें आहे. त्यांचें विलक्षण बुद्धि-सामर्थ्य, सरस्वतीसही जिंकणारें अप्रतिम वक्तृत्व व वाक्पटुत्व, तसेंच कडकडीत वैराग्य, या व अशाच इतर गोष्टी चरित्रामध्यें सहज प्रामुख्यानें दिसतात. त्यांचें चरित्र वाचीत असतांना वाचकांचें मन साहजिकच त्यांत रमून जातें व क्षणभर कां होईना, पण त्यास बाह्य जगाचें विस्मरण होतें. नास्तिक लोकांस अर्थातच या अलोट बुद्धिसामर्थ्याचें व वैराग्याचें वर्णन पटणार नाहीं. पण ज्यांचें समाधान प्रत्यक्ष ब्रह्मदेवासही करतां येणार नाहीं, अशा नास्तिक व पाखांडी लोकांकरतां हें चरित्र लिहिलें नसून भाविक अंतःकरणाच्या लोकांकरतांच लिहिलेलें आहे. शंकराचार्य हे परम मातृभक्त होते, इतर व्यवसायांत ते आपल्या मातेस विसरले नाहींत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ते अद्वैतवादी असल्यानें कित्येकांचा त्यांस विरोध होता. परंतु द्वैत ही अद्वैतांत जाण्याची पायरी असल्यानें वास्तविक हा विरोध नव्हता. अज्ञ जनांकरतां द्वैतमार्ग असून अद्वैतमार्ग हा महाबुद्धिमान् योग्याकरतां आहे. एकाच साध्याकरतां हे भिन्न मार्ग आहेत. अज्ञाची प्रज्ञावानामध्यें परिणति झाली म्हणजेच परब्रह्मस्वरूपाची प्राप्ति होते. शंकराचार्यांचें चरित्र वाचीत असतांना वाचकांस श्रीज्ञानेश्वरांची आठवण झाल्यावांचून राहात नाहीं. दोघेही महाबुद्धिवान्, अल्पायुषी व वैराग्यसंपन्न होते. शंकराचार्यांनीं उपनिषदावर संस्कृत भाष्य लिहिलें, तर ज्ञानेश्वरांनीं श्रीमद्भगवद्गीतेवर प्राकृत टीका लिहिली. या दृष्टीनें आर्यावर्ताइतका संपन्न व भाग्यवान् देश अखिल भूतलावर अन्यत्र सांपडणार नाहीं.

सांप्रत वैदिकधर्मास जें शैथिल्य प्राप्त झालें आहे त्याचें कारण या धर्मास कोणीही शास्ता नाहीं हेंच होय. परधर्मीयांचें

राज्य असल्यानें त्यांना या धर्माविषयीं कळकळ कितीशी असणार हें दिसतेंच आहे! आपल्या प्राचीन काळापासून चालत आलेल्या शंकराचार्यांच्या गादीवर असलेल्या जगद्गुरूच्या हातीं सरकारनें मुळींच सत्ता ठेवली नाहीं ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट आहे. त्यामुळें कोणाचा मेळ कोणास राहिला नाहीं, अशी शोचनीय स्थिती प्राप्त झाली आहे. अशा वेळीं श्रीशंकराचार्यांचें चरित्र प्रसिद्ध होत आहे ही गोष्ट त्यांतल्या त्यांत समाधानाची आहे. श्रीशंकराचार्यांचे चरित्र व त्यांचें भाष्य वगैरे ग्रंथ अज्ञानांधकारांत चांचपडत असलेल्या अज्ञ जीवांस, समुद्रांत मार्ग चुकलेल्या नावाड्यास ज्याप्रमाणें उत्तरध्रुव मार्गदर्शक होतो, त्याप्रमाणें मार्गदर्शक होतील असा मला भरंवसा आहे. प्रस्तुत लेखकानें या चरित्रास प्रस्तावना लिहिण्यास सांगून मला आचार्यांची, अल्पशी कां होईना, पण सेवा करण्याची सुसंधी लाभून दिली, याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानून ही प्रस्तावना पुरी करतों.

शंकर दत्तात्रेय रबडे,

बी. ए.

---

# लेखकाचें मनोनिवेदन.

जन्मादारभ्य व कैलासगमनापर्यंत ज्यानें आपलें आयुष्य अखिल जगाच्या उद्धाराप्रीत्यर्थ खर्च केलें, व अपौरुषेय अशा वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन करण्याकरतांच अवतारकार्य दर्शविलें, त्या यति सम्राट् आद्य श्रीशंकराचार्यांचें चरित्र आज वैशाख शु॥ ५ आचार्य जयंतीच्या शुभप्रसंगीं प्रसिद्ध करण्याचा योग येत आहे, याबद्दल आनंद वाटतो. वाङ्मयसेवेच्या रूपानें साहित्यक्षेत्रामध्यें मी प्रथमच प्रवेश करीत आहें. तो प्रयत्न कितपत यशस्वी होईल, याबद्दल माझें मन संशयांत आंदोलन करीत आहे. अनधिकारी व्यक्तीनें नवीनच प्रयत्न केल्यास, होणाऱ्या पुस्तकांतील अधिकोत्तर प्रमादास्तव जनतेकडून मिळणारे आघात सहन केलेच पाहिजेत. आपला दोष आपणास कधींच दिसणार नाहीं. लोकांच्या दृष्टीसमोर आलें असतां आपल्या चुका सुधारून पुढें व्यवस्थित मार्ग तरी सांपडेल, या सद्धेतूनें हें अल्पसें चरित्र लिहून जनतेपुढें अभिप्रायार्थ सादर करीत आहें. हा सद्धेतु मनांत बाळगून, प्रज्ञावान् वाचकांकडून माझ्या पहिल्याच अल्प कृतीचा अव्हेर न व्हावा अशी विनंति आहे.

ज्या महाभाग पुण्यश्लोक आद्य श्रीशंकराचार्यांच्या अत्यंत परिश्रमानें हा सनातन वैदिक धर्म आजवर टिकून राहिला, त्या श्रीमदाचार्यांचें महाराष्ट्रभाषेंत सामान्य स्त्री, पुरुष व बालवाचकांकरितां एक चरित्र लिहावें असा बरेच दिवसाचा मानस होता. तो सुदिन आज श्रीआचार्यांचे कृपेनें प्राप्त झाला आहे. आचार्यांचीं मराठी भाषेंत फारच थोडीं चरित्रें लिहिलीं गेली. संस्कृत भाषेंत चरित्रपर पुष्कळ ग्रंथ आहेत. परंतु ते ग्रंथ प्राकृत सामान्य जन-

तेला कळणें फार कठीण आहे. आचार्यांच्या अवताराचें महत्व काय, आपल्या श्रेष्ठ जगद्गुरूंनीं कोणची कामगिरी केली, तत्पूर्वी बौद्ध जैनांच्या वेदविरुद्ध प्रवृत्तीमुळें सामान्य भोळ्या वैदिक धर्मीयावर कसा विपरित परिणाम झाला होता, त्या सर्व विरुद्ध धर्ममतांचा पाडाव कसा झाला, इत्यादि अनेक मनोवेधक, हृदयंगम, व कांहीं प्रसंगीं हृदयस्पर्शी अशा सत्यसृष्टींत घडलेल्या आपल्या धर्मगुरूंच्या गोष्टी सर्वत्रांस माहीत व्हाव्यात, याच हेतूनें हा प्रयत्न केला आहे. पाखंडवादी लोकांनीं केलेल्या चित्तभ्रमाचें निरसन व्हावें, वैदिक धर्मावर आपली श्रद्धा चिरकाल टिकावी, व स्वधर्माच्या योगानें आपलें इहपरलोकींचें उत्कृष्ट साध्य साधावें हाच आचार्यांच्या अवताराचा मुख्य हेतु होता. त्याच धार्मिक मताचा प्रसार व्हावा, व सध्या चालू असलेले परधर्माचे हल्ले परतविण्याचें सामर्थ्य आमच्यांत उत्पन्न व्हावें, याच उद्देशानें हें कार्य करण्याचें ठरवून तें पुस्तकरूपानें पुढें ठेविलें आहे. श्रीमदाचार्यांचीं अनेक चरित्रें आहेत, व पुढें होतीलही. परंतु आपणही या रूपानें धर्मगुरूंची सेवा करावी, असें मनोदेवतेनें सांगितल्यावरून हें गद्य-चरित्र, व आचार्यांच्या स्तुतिपर कांहीं पद्यें, व इतर कांहीं देवांचीं पदें या पुस्तकांत घातलीं आहेत. मी विनंति केल्यावरून आचार्यकुलाचे सन्मान्य विद्वान् संस्थापक वे. शा. सं. विष्णुशास्त्री बापट यांनीं आपला अमूल्य वेळ खर्च करून मला योग्य त्या सांप्रदायिक सूचना दिल्या, याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों. तसेंच माझे मित्र रा. रा. शंकर दत्तात्रय रबडे, बी. ए., यांनीं या ग्रंथास उत्तम प्रस्तावना लिहून दिली याबद्दल त्यांचाही मी फार ऋणी आहे. श्रीविद्यारण्यांचा शंकरदिग्विजय ग्रंथ शोधण्याचे कामीं, माझे सहकारी मित्र'

रा. रा. गोविंद नरहर पंढरपुरे, यांनीं मला फार मदत केली. त्यांच्या स्वार्थनिरपेक्ष मदतीबद्दल त्यांचे जेवढे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत. त्याचप्रमाणें या ग्रंथांतील पद्यांच्या चाली उत्तम तऱ्हेनें बसवून दिल्याबद्दल चिंचवड येथील प्रसिद्ध गवई रा. रा. दत्तात्रय विष्णु पालकरबुवा यांचाहि मी फार आभारी आहें.

शेवटीं सत्यान्वेषण करणाऱ्या विद्वान् वाचकांस नम्र विनंति करितों कीं, हंसक्षीरन्यायानें या छोट्या पुस्तकांतील उपयुक्त भाग असेल तो घ्या व कमी अधिक, शुद्धाशुद्ध, असंबद्ध व अप्रासंगिक असे जे कांहीं दोष घडले असतील त्याबद्दल क्षमा करा, अशी सविनय प्रार्थना करून हें मनोनिवेदन पुरें करतों.

श्रीक्षेत्र चिंचवड,<br>वैशाख शु॥ ५<br>शके १८५३.

वैदिक धर्मानुयायी,<br>वासुदेव विष्णु कवि.

---

# श्रीमत् आद्य शंकराचार्य

# यांचें चरित्र

## प्रकरण १ लें

भारत वर्षामध्यें इसवी सनापासून ज्या मोठमोठ्या धर्मांच्या व राज्याच्या संस्मरणीय अशा क्रांत्या झाल्या त्या सर्व गतकालच्या इतिहासांत पाहावयास सांपडतात. परधर्मीय लोकांच्या होणाऱ्या हल्ल्यांपासून धर्माचें व देशाचें रक्षण गौतम बुद्धाच्या व जैनांच्या पूर्वी करावें लागत असे. परधर्मीय नृपतीच्या आघाताचें निवारण करावयाच्या कार्यांत सर्व भारतवर्ष स्वधर्माच्या जाणीवेनें एकत्र होऊन लढत असे, व तशा प्रकारचें निवारण अनेकवार झालेंही. व त्या सत्वपरीक्षणाचे कार्यीं आमचा आर्यावर्त अनेकवार उत्तीर्ण-ही झाला. पण बौद्ध व जैन यांच्या धर्मवादाचें निराकरण कसें होणार ? सर्व प्रकारें हतबल व निष्प्रभ बनलेली भोळी जनता या पाखंडवादानें भारली गेली. यज्ञयागादिकेंकरून प्राण्यास फार यातना होतात व द्रव्यशोषही होतो. हिंसा घडल्यानें आपण परमेश्वराचे अपराधी ठरतों. तेव्हां जीवाची हत्त्या करा, असा देव उपदेश कसा करील ? तर हें केवळ थोतांड आहे. बुद्धिमान व चाणाक्ष असणाऱ्या, यज्ञादि कर्में करणाऱ्या, धूर्त श्रोत्रियांनीं स्ववर्गाची महती वाढावी, आपली ज्ञानसंपन्नता कायम टिकावी, व आपल्या तंत्रानें सर्व जनतेनें कायमचें रहावें, एतदर्थ या सर्व

कल्पना तुम्हांत भरविल्या आहेत. तेव्हां या सर्व कल्पना तुम्ही दूर करा, व शांतिब्रह्म अशा अहिंसावादी धर्मास येऊन मिळा, असा उपदेश सर्वत्र हिंदुस्थानांत झाला. व त्याचा पाडाव करण्याचें सामर्थ्य विशेष कोणामध्यें नसल्यानें, या उभय अवैदिक मतांचा फैलाव देशांत जोरानें व्हावयास लागला. यदृच्छेनें जें होईल तें सत्य मानून स्वस्थ बसावें. वेद ही एक मानवी कल्पना आहे. प्रत्यक्षच प्रमाण मान्य. ‘ चक्षुर्वैसत्यं. ’ प्रत्यक्ष दृष्टिपथास येईल तेंच खरें. अनुमान व कल्पना सर्व व्यर्थ आहे. मूर्तिपूजा बिलकूल करूं नका, इत्यादि अवैदिक मतानें भोळ्याभाबड्या व कांहीं चांगल्या लोकांचाही बुद्धिभेदाच्या योगानें, आर्यावर्तांत एकच गोंधळ होऊन धर्मसंकर होण्याचा समय प्राप्त झाला. सनातन वैदिक धर्मांतूनच फुटलेले, उलटलेले व ज्या वर्णाश्रमधर्मांत आपण जन्म घेतला, त्यास पूर्णपणें पारखें होऊन, त्या धर्मास सर्वस्वी नामशेष करण्याकरतां चंग बांधून स्वत्व विसरणारे लोक सर्वत्र ठिकाणीं विजयानंदानें नाचूं लागले. एक वेळ परक्या शत्रूचा प्रतिकार करणें सोपें जाईल; परंतु घरांतल्या घरांतच कलहाग्नीनें द्वेष पसरवून जिव्हारीं शस्त्र घेऊन, धर्मावर उठलेले हे आपलेच, पण आतां सवतासुभा स्थापन करणारे बौद्ध जैन ताळ्यावर कसे येणार ? हा अस्तनींतील निखारा शांत कसा होणार ? या यादवीचा परिणाम अखिल आर्यावर्त अवैदिक बनण्यांत होणार कीं काय, अशी साधार भीती उत्पन्न झाली. बाहेरील उंटाचें पिलूं घरांत न येऊं देणें हें एकवेळ शक्य होईल. पण घरांतच उत्पन्न झालेलें, व खंबीर नेत्याच्या अभावामुळें अज्ञ लोकांकडून सक्रिय सहानुभूतीमुळें पुष्ट होणारें व स्वधर्मनाशार्थ अवतीर्ण झालेलें हें उंटाचें पिलूं, वाढत जाऊन घराचा पूर्ण विध्वंस होणार

अशी भीती उत्पन्न झाली. राज्यक्रांतीपेक्षां धर्मक्रांति फार अनर्थावह होते. प्रसंगविशेषीं राज्यक्रांतीचेंही निवारण करतां येईल; परंतु लोकांच्या मनोभूमिकेंत धर्मपरिवर्तनाचें बीज एकदां कां रुजलें, कीं मग त्या परधर्ममतांचा नाश होण्यास महान् प्रयास पडतात. व कधीं कधीं तर तें कार्य अशक्य कोटींत येऊन बसतें. तो प्रसंग उग्र स्वरूपानें दृष्टीसमोर नाचूं लागला, व यावेळीं जर योग्य तो प्रतिकार झाला नाहीं तर सर्वत्र देश बुद्धमय होऊन जाईल, व परमेश्वराच्या श्वासोच्छ्वासरूपानें प्रकट झालेला वैदिक धर्म लुप्त होऊन,

यदायदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहं ।

ही वरील भगवदुक्ति मिथ्या ठरेल; म्हणूनच पूर्वसंकेतानुरूप श्रीभगवान् शंकरांनीं श्रीशंकराचार्यांचे रूपानें अवतार घेतला.

---

## प्रकरण दुसरें

### मंगलाचरण

ज्या सर्व स्वतंत्र भगवान् परमेश्वराच्या इच्छामात्रेंकरून हें नश्वर चराचर अखिल ब्रह्मांड उत्पन्न झालें, ज्याच्या एका दृष्टिपातानें राजाचा रंक व रंकाचा राजा एका निमिषार्धांत होतो, ज्याच्या आज्ञेनें हें दृश्यादृश्य भासणारें व अनंत असणारें सर्व जगत् क्षणांत उत्पन्न होतें व ज्या परमेश्वराचा संकेत होतांच तत्काळ नाश पावतें, त्या सच्चिदानंद प्रभु चरणारविंदास मी सद्भावानें अभिवादन करतों. जो सर्वांचा नियंता असून सर्वत्र पूर्णत्वानें भरला आहे, ‘ कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् ’ अशी ज्याची अतुलनीय शक्ति, हिरण्याक्षा-

सारखे भीमपराक्रमी व त्रैलोक्यास संत्रस्त करणारे महाप्रचंड दैत्य ज्यानें आपल्या शक्तिप्रभावानें धुळीस मिळविले, त्या परमेश्वराचे गुणानुवाद किती वर्णन करावे ! वृद्ध, तरुण व बालक स्त्री-पुरुषांच्या व अखिल प्राणिमात्राच्या अंतरामध्यें जो जीवस्वरूपानें भासतो, तसेंच पंचमहाभूतांच्या जगव्यापक असामान्य शक्तीनें जो अनुभवास येतो, ज्याची स्तुति करतांना महान् तत्त्वज्ञानी, तपोनिधि, संतमहात्मे श्रमी झाले, 'नेति नेति' असें म्हणून ज्या वेदालाही या ईशस्वरूपाचें पूर्ण ज्ञान न झाल्यामुळें स्वस्थ बसावें लागलें, तो परमेश्वर कसा आहे, हें मी पामर काय सांगूं शकणार ! व्यक्ताव्यक्त भेदाभेद, सगुण, निर्गुण सूक्ष्म व पर्वताकार बुद्धिगम्य व अचिंत्य व अशाच तऱ्हेच्या सर्वतोपरी बुद्धीस कुंठित करणाऱ्या त्या मायातीत परब्रह्माचें ज्या ज्या तऱ्हेनें गुणगान करावें तेवढें अपुरेंच पडणार आहे. मानवी कर्तृत्व श्रेष्ठ, का ज्या अव्यक्त असणाऱ्या प्रभूनें हा सर्व स्थावरजंगम असा अखिल विश्वसंसार उत्पन्न केला, त्याचे उपकार श्रेष्ठ ? या विश्वाचा आधारभूत असणारा तो परमेश्वर सर्वत्र भरला असून, निमित्तमात्र कांहीं कार्य उत्पन्न करून कोणातरी व्यक्तीकडून तें कार्य पूर्ण शेवटास नेतो, तोच परमात्मा श्रेष्ठ होय. कर्ता करविता असा मूळ तोच श्रीहरि आहे. तेव्हां सामान्य माणसानें कर्तृत्वाचा वृथाभिमान कशास मिरवावा ? प्रज्ञावान् लोक या असत्य असणाऱ्या अहंकारापासून अगदीं अलिप्त असतात. व या श्रेष्ठभावना बलाच्या योगानें ते संत महात्मे पदास प्राप्त होऊन व परमेश्वरस्वरूपांत समरस होऊन कीर्तिपरिमलाच्या योगानें ते टिकले, व 'यावच्चंद्रदिवाकरौ' ते टिकतील. प्राणिमात्रामध्यें अधिक योग्यता या नरदेहाची आहे. व देवानें इतर जीवजंतूंपेक्षां मनुष्यावर फार उपकार केले

आहेत. अशी विशेष प्रकारची देणगी परमेश्वरानें मनुष्यास काय दिली आहे, तर ती म्हणजे अत्युच्च प्रकारची बुद्धिमत्ता व विचारशक्ति. ही विवेकशक्ति इतर प्राण्यांचे ठिकाणीं आहे काय? तर नाहीं. बुद्धिहीन पशुपक्ष्यांमध्यें आपणांस परमेश्वरानें उत्पन्न केलें नाहीं, तर उच्चतर अशा मानवांमध्यें आपणांस उत्पन्न केलें, याबद्दल त्या परमेश्वराचे उपकार आपण स्मरावयास नकोत काय? उपकारकर्त्याचे उपकार विसरणें हें कृतघ्नपणाचें ठरेल. परमेश्वराच्या अमोल उपकाराची जाणीव ठेवून त्या दीनदयाघन परमेश्वराची आराधना आपण एकनिष्ठेनें करावयास पाहिजे. ती सेवा मग कोणत्याही स्वरूपाची कां असेना. ज्याच्या त्याच्या शक्तीप्रमाणें, व असणाऱ्या गुणवैशिष्ट्यानें देवास आळविण्याचा प्रयत्न बुद्धिपुरस्सर करावा. भारतवर्षामध्यें साधुसंतांच्या, तत्त्ववेत्त्यांच्या व योगीजनांच्या रूपानें अवतार घेणारे जे जे असामान्य लोकोत्तर पुरुष होऊन गेले, ते ते सर्व ईश्वराचे अंश होते याबद्दल संशय नाहीं. त्या सर्व महान् व्यक्तींमधें श्रीशंकराचार्यांचा अवतार अनुपमेय व अग्रेसर ठरेल. त्यांचीच सेवा वाङ्मयरूपानें मी यथामति चरित्ररूपानें करीत आहें.

प्रथम प्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणें धर्ममतांचा सर्वत्र गलबला झाला व त्यामुळें भाविक जनता फार व्याकूल झाली. भगवद्गीतेंत सांगितल्याप्रमाणें श्रीशंकरांना सनातन वैदिक धर्माचा होत असलेला ऱ्हास थांबविण्याकरतां अवतार घेणें भाग पडलें. कर्म-उपासना-ज्ञान, असा कांडत्रयात्मक जो वेद, त्याचा उद्धार केला असतां ब्राह्मणांचा उद्धार होईल. ब्राह्मणांचें रक्षण केल्यानें सर्व जगाचें कल्याण होईल. कारण सर्व वर्णाश्रमधर्माचें मूळ कारण ब्राह्मण आहेत. ‘ब्राह्मणत्वस्यहि रक्षणेन रक्षितस्यात् वैदिको धर्मः।

तदधीनत्वात् वर्णाश्रम भेदानाम् । असें आचार्यभाष्य आहे. अशा-प्रकारें जगताच्या उद्धाराकरितां अवतार घेण्याचें सर्व देवांनीं ठरविलें. पृथ्वी शंकरास शरण गेली. तेव्हां श्रीशंकर, ब्रह्मदेव व इंद्रादि देवतांनीं अनुक्रमें, श्रीशंकराचार्य, मंडनमिश्र व सुधन्वा नृपति या रूपानें अवतार घेण्याचें ठरविलें. श्रीविष्णु हे संकर्षण, व शेष हा पतंजली होईल. षडानन सुब्रह्मण्य होईल. याप्रमाणें पृथ्वीस आश्वासन देऊन देवांनीं या भूमंडलावर अवतार घेतले. हे अवतारी पुरुष अत्यंत विद्वान होते. त्यांनीं आपल्या दिव्य विद्वत्तेच्या प्रभावानें सर्व जनतेचीं मनें आकर्षण केलीं, व त्यांचें विलक्षण वजन जनतेवर पडलें. पतंजली व संकर्षण यांनीं कर्मकांड व उपासना-कांडाचा उद्धार केला. सुब्रम्हण्यानें जैमिनीकृत मीमांसाशास्त्राचा उद्धार केला. सुधन्वा हा प्रथम जैनांचा अभिमानी होता. वाद-विवाद करीत भट्टपाद सुधन्वा नृपतीकडे आला. त्याचा सुधन्व्याशीं वादविवाद झाला. त्यांत भट्टपादानें जैनमतांचें खंडन करून राजास सनातन वैदिकधर्माचा उपदेश केला. भट्टपादाचा व जैन पंडितांचा फार उग्र स्वरूपाचा वाद झाला. परंतु जैनांचें कांहीं समाधान झालें नाहीं. शेवटीं जैन पंडितांनीं भट्टपादास तुमचा धर्म ईश्वरप्रणीत आहे ना? तर मग तुह्मी पर्वतावरून खालीं उडी घ्या. या दिव्यांत जर तुह्मी सुरक्षित राहिलात तर तुमचा धर्म सत्य, प्रत्यक्ष ईश्वरप्रणीत आहे असें आह्मी समजूं. या दिव्यास कबूल होऊन भट्टपादानें पर्वतावरून परमेश्वराचें ध्यान करून खालीं उडी टाकली. चमत्कार असा कीं, परमेश्वर खराच वैदिक धर्माचा पाठी-राखा होता, ह्मणून भट्टपादास फुलांच्या राशीवर आपण उभे आहोंत असा भास झाला, व त्यास कोणच्याही प्रकारची इजा झाली नाहीं. तरीही समाधान न झाल्यानें सुधन्वा नृपतीनें वादाचा अखेरचा

निकाल ठरविण्याकरितां एक दिव्य करावयाचें योजिलें. त्यानें एका भांड्यांत नाग घालून त्याचें तोंड बंद केलें व तें भांडें वादस्थळीं आणलें. या भांड्यांत काय पदार्थ आहे हें जो पंडित बरोबर सांगेल त्याचा सत्पक्ष व तोच विजयी झाला असें ठरून पराजय होणाऱ्या पक्षाचें पूर्ण उच्चाटन होऊन, तो देहदंडास पात्र होईल असा राजानें निश्चय ठरविला. प्रथम राजानें जैन पंडितास यांत काय आहे असें विचारलें. त्यांनीं उत्तर देण्यास अवधी मागून घेतला, व ज्योतिषशास्त्राचे योगानें यांत नाग आहे असें सांगितलें. जैनाचें उत्तर बरोबर होतें. तेव्हां गरीब बिचारा भट्टपाद ब्राह्मण उत्तर खास चुकणार व अखेर विनाकारण या तंट्यामध्यें मारला जाणार, या काळजीनें राजास मनस्वी वाईट वाटलें व त्यामुळें सुधन्वा दुःखित झाला. आपल्याबद्दल राजास दुःख होत आहे असें दिसतांच भट्टपाद ह्मणतो, राजा, तूं काळजी करूं नकोस. परमेश्वर याही संकटांतून माझें रक्षण करण्यास समर्थ आहे. असें निर्भयपणें बोलून या भांड्यामध्यें शेषशायी आहे असें निश्चयपूर्वक भट्टपाद ह्मणाला. तत्काळ सांगण्याचे योगानें राजाचा भट्टपादाच्या सांगण्यावर विश्वास बसला. आतां यामध्यें विजयी कोण होतो याबद्दल प्रेक्षकांस चिंता उत्पन्न झाली. शेवटीं राजानें भट्टपाद विजयी आहे असा निर्णय दिला. जैनपंडितांच्या धर्ममताबद्दल राजास भयंकर द्वेष उत्पन्न होऊन, त्यानें जैनमतानुयायी लोकांचा शिरच्छेद केला. भट्टपादानें नंतर बौद्धमताचाही पाडाव केला. अशा रीतीनें पुनश्च वैदिक मतांचा विजय होऊन, कर्ममार्गाकडे लोकांची प्रवृत्ती वाढूं लागली.

याच सुमारास मद्रासकडील केरळ प्रांतांत पूर्णानदीच्या तीरावर श्रीभगवान् शंकर ज्योतिर्लिंग स्वरूपानें राहिले. त्या शंकराचें

ज्योतिर्लिंगावर राजशेखर नांवाच्या भूपतीनें एक देवालय बांधिलें. त्या देवालयाजवळ कालटी नांवाचें एक गांव होतें. तेथें विद्याधिराज नांवाचा एक ज्ञानसंपन्न ब्राह्मण राहात असे. त्याला पुत्रसंतति नसल्यानें तो त्या ज्योतिर्लिंगाची एकनिष्ठेनें सेवा करूं लागला. पूर्ण श्रद्धेच्या योगानें श्रीशंकर विद्याधिराज ब्राह्मणास प्रसन्न झाले, व त्या ब्राह्मणास स्वतःच्या नांवाप्रमाणें कृति करणारा असा एक पुत्र प्राप्त झाला. त्या मुलाचें यथाशास्त्र जातकादि संस्कार करून शिवगुरु असें नांव ठेविलें. पुढें त्या मुलाचें उपनयन होऊन वेदशास्त्रपठण झाल्यावर लग्न झालें. त्याच्या पत्नीचें आर्यांबा असें नांव होतें. ते पतिपत्नी आपल्या अग्निहोत्रादि गृहस्थाश्रमांत निमग्न झाले. बरेच दिवस झाले तरी पुत्रसंतान न झाल्यामुळें शिवगुरूस फारच खेद उत्पन्न झाला. व अपुत्रिकाला ' नापुत्रस्यलोकोऽस्ति ' गति नाहीं म्हणून वाईट वाटलें. या गोष्टीनें शिवगुरु एकदां सचिंत असतां त्यांची स्त्री आर्यांबा म्हणते, महाराज, आपण वृथा शोक कां करतां? आपल्या हातांत काय आहे? परमेश्वर सर्वसाक्षी आहे. आपलें दुःख त्याला माहीत आहे. तर तोच परमेश्वर आपले मनोरथ पूर्ण करील. तरी आपण त्यालाच शरण जाऊं. पुढें उभयतां पतिपत्नीनें कडकडीत तपाचे योगानें शंकराची आराधना चालविली. एके दिवशीं स्वप्नामध्यें शिवगुरूस श्रीशंकरांनीं दर्शन दिलें, व ब्राह्मणाचे रूपानें तपाचें कारण विचारिलें. तेव्हां शिवगुरूनें पुत्रप्राप्तीची इच्छा प्रदर्शित केली. श्रीशंकरांनीं उलट विचारिलें कीं, तुला उत्तम व सर्वज्ञ असा एक पुत्र हवा, अथवा सामान्य प्रकृतीचे अनेक मुलगे पाहिजेत? तेव्हां शिवगुरूनें एकच पण सर्वज्ञ असा पुत्र मागितला. तेव्हां ' प्रत्यक्ष शंकरच तुझ्या उदरीं जन्म घेतील ' असें सांगून ब्राह्मणाच्या स्वरूपानें आलेले श्रीशंकर स्वप्नांतच अदृश्य झाले.

जागृत झाल्यावर शिवगुरूनें आर्यांबेला रात्रीं स्वप्नांत घडलेला वृत्तांत सांगितला, व तेव्हांपासून प्रसन्नचित्तानें उभयतां पतिपत्नी शंकराची भक्ती करूं लागले. देवाच्या वरप्रसादेंकरून कांहीं दिवसांनीं आर्यांबा गर्भवती झाली. त्यामुळें तिच्या शरीरावर उत्तम कांति दिसूं लागली. गर्भ राहिल्या दिवसापासून आर्यांबेच्या ठिकाणीं सर्व प्रकारच्या विषयांविषयीं, प्रपंचादि खाणेंपिणें, वस्त्रप्रावर्णादि एकंदर सर्व गोष्टींविषयीं पूर्णपणें विरक्ती उत्पन्न झाली. नवमास पूर्ण होतांच वैशाख शु॥ पंचमीला सूर्यादि ग्रह उच्चस्थानीं आहेत, शुभलग्न व केंद्रीं गुरू असतांना आर्यांबा प्रसूत होऊन पुत्ररूपानें श्रीशंकर अवतीर्ण झाले. जन्मसमयीं भूतलावर सर्वत्र प्रसन्नता दिसूं लागली. सुंदर सुगंधयुक्त पवन वाहूं लागला, मेघ गंभीर नाद करूं लागले, वृक्षामध्यें एकाएकीं टवटवी उत्पन्न झाली, कोकिला मधुर गान करूं लागल्या, व गाई आपलें पुच्छ उभारून नाचूं लागल्या. निसर्गानें याप्रमाणें आपला आनंद प्रकट केला. परंतु त्यावेळीं पाखंडवादी लोकांस एकाकीं कंप उत्पन्न होऊन त्यांच्या हातांतील पुस्तकें खालीं गळून पडलीं.

उत्तम पुत्र झाल्यावर शिवगुरु व आर्यांबा यांना फारच आनंद झाला. हा मुलगा फारच बुद्धिमान् व अलौकिक कृति करणारा होईल, असें ज्योतिर्विद सांगूं लागले. मोठ्या समारंभानें बालकाचें जातक वर्तवून शंकर असें त्याचें यथायोग्य नांव ठेविलें. त्या मुलाच्या ललाटावर नेत्राचें, स्कंधावर शूलाचें व मस्तकावर चंद्राचें, अशीं चिन्हें दिसूं लागतांच हा मुलगा शंकराचा खास मोठा अवतार होईल असें मानून त्या बालकाकडे सप्रेम अभिमानानें सर्व जनता पाहूं लागली.

---

# प्रकरण तिसरें

थोरांचें सर्व आयुष्यच जेथें असामान्यपणें व्यतीत होतें, तेथें त्यांचें बालपण तरी सामान्य मुलासारखें कसें जाणार ! प्रथम वर्षीच श्रीशंकराचार्य देशभाषा ( मातृभाषा ) बोलूं लागले. दुसऱ्या वर्षी वर्णविज्ञान लिहिणें, वाचणें पूर्ण येऊं लागलें. त्याबरोबरच पुराण व कथा श्रवण करूं लागले. दुर्दैवानें तिसरे वर्षी आचार्यांचे वडील शिवगुरु कालवश झाले, आर्यांबेवर पतिनिधनामुळें वैधव्याचा दुर्धर प्रसंग कोसळला. पित्याच्या आकस्मिक व अकालीं निधनामुळें आचार्यांचा घरांतील आधारच नाहींसा झाला, व आपल्या या अल्पवयी मुलाचें पुढें कसें होणार याची हृदयविदारक काळजी आर्यांबेस रात्रंदिवस जाचूं लागली. झाल्या गोष्टीस इलाज नाहीं असें समजून आचार्यांनीं व आर्यांबेनें आपला नित्याचा क्रम चालू ठेवला. याच सुमारास किंचित् पण स्वाभाविक अशी ग्रहणशक्ति ( प्रतिभा ) चरित्रनायकाचे ठिकाणीं उत्पन्न झाली होती. चवथ्या वर्षी श्री भगवान् शंकरांच्या प्रसादानें त्यांना सर्वज्ञता प्राप्त झाली. पांचव्या वर्षी चौलादि तत्पूर्वी करावयाच्या सर्वःसंस्कारासह आचार्यांचें त्यांच्या गुरूनें उपनयन केलें व वेदाध्ययनास आरंभ झाला. गुरूनें एकदां सांगतांच व एकवार म्हणतांच पाठ होई. सर्वज्ञ आचार्यांस कोणची कला अवगत नव्हती ? परंतु लोक व्यवहाराकरतां व गुरूंची परंपरा टिकावी याकरतांच त्यांना गुरुजीकडे जाणें भाग पडलें. चतुर्वेदांचें अध्ययन सांगोपांग (शिक्षा, कला, व्याकरण, निरुक्त, छंदासह. मुंडक० १–५ ) होतांच आचार्य वेदावर प्रवचन करूं लागले. अष्टवर्षापर्यंत अतिअल्पवयांत चतुर्वेदांचें सार्थ अध्ययन पूर्ण करणारें हें बालक पुढें अपूर्व

कृति करून चिरकाल कीर्तिपरिमलानें जगतांत विलसणार असें त्यांच्या गुरूसही वाटून त्यांना आनचार्याबद्दल कौतुक व सप्रेम अभिमान उत्पन्न झाला. त्या अल्पवयांत त्यांचें इतकें उत्कृष्ट वक्तृत्व होतें कीं, कोणीही त्यांच्यापुढें बोलण्यास धजेना. सहज लीलेनें ते कुमतांचा पाडाव करूं लागले. एकेवेळीं आचार्य एका निर्धन ब्राह्मणाकडे भिक्षेकरतां गेले. त्या ब्राह्मणाचें दैव उदयास यावयाचें होतें, म्हणून किंवा आचार्यांस त्या सत्पात्र गरीब ब्राम्हणास धनवान् करावें, एतदर्थ : आचार्य तेथें आले. ( या वेळीं आचार्य गुरुगृहीं विद्याभ्यासासास्तव राहिले होते. ) ब्राम्हणाचें घरांत गेल्यावर ॐ भवति भिक्षांदेहि, असें नित्याप्रमाणें ते म्हणाले. तेव्हां त्या निर्धन ब्राम्हणाची भार्या सत्वर धांवत पुढें आली व तिनें अतिथीस आदरानें नमस्कार करून लीनतेनें म्हणाली, महाराज, आपण आम्हां दीनांचे घरीं येऊन आम्हांला पावन केलें आहे. आपला हा आमच्यावर अनुग्रहच म्हणावयाचा. आपणास भिक्षा घालणारे जे कोणीं भाग्यवान् प्राणी असतील, ते खरोखर धन्य होत. आम्ही दुर्दैवी पातकी लोक. निर्धनतेमुळें तुम्हांस आमच्या येथें भिक्षाही मिळूं नये ही खरोखर आम्हांस लाजिरवाणी गोष्ट आहे व यामुळें माझ्या मनाला अतीशय खेद होतो. असें म्हणून तिनें घरांत असलेला एक आमलक ( आंवळा ) भिक्षेमध्यें घातला. विप्रस्त्रीचें तें दीन भाषण श्रवण होतांच दयार्द्र होऊन आचार्यांनीं श्रीमहालक्ष्मीचें ध्यान केलें. ध्यानाच्या योगानें महालक्ष्मी संतुष्ट होऊन प्रत्यक्ष आचार्यांच्या समोर उभी राहिली, व काय आज्ञा आहे अशी तिनें पृच्छा केली. आचार्यांनीं या गरीब ब्राम्हणास सधन कर, असें सांगतांच श्रीलक्ष्मी म्हणते, या ब्राम्हणानें द्रव्य प्राप्त होण्याइतकें पुण्य केलें नाहीं, तेव्हां मी त्याच्यावर दया

कशी करूं? तेव्हां आचार्य म्हणतात, माझ्यावर तर तुझी कृपादृष्टि आहेना? एवढ्याकरतां मी सांगतों म्हणून या विप्रास धनवान् कर. इतक्यांत लक्ष्मीच्या कृपादृष्टीनें त्या ब्राह्मणाचें घर सुवर्णाच्या आंवळ्यांनीं परिपूर्ण भरलें. हा चमत्कार दृष्टीस पडतांच त्या विप्र पतिपत्नींना अतिशय आनंद होऊन ते आचार्यांचे चरणीं नम्र होऊन स्तवन करूं लागले. अशाच अनेक दिव्य चमत्कृतिपूर्ण गोष्टींनीं अल्पवयांतील हें बालक सर्वत्र आदरास पात्र झालें. अगाध विद्वत्ता, सहजस्फूर्तीनें होणारें उत्कृष्ट भारदस्त वक्तृत्व, कुमतांचें, तत्काळ खंडन करावयाचें अप्रतिम गुणधैर्य, व शुद्धाचरण या व अशाच अनेक प्रकारच्या गुणसमुच्चयामुळें बहुजनसमाजावर त्यांची विलक्षण छाप बसली. त्यामुळें भाविक जनता त्यांची आदरानें सेवा करूं लागली. सातवे वर्षी गुरुगृहांतून विद्या संपवून परत घरीं आल्यावर आचार्य स्वमातेची–आर्यांबेची सेवा करूं लागले. एकदां आर्यांबा स्नानाकरतां पूर्णा नदीवर गेली. द्वापकाळ झाल्यानें व सूर्याच्या प्रखर तापानें पीडा होऊन ती नदीवरच मूर्च्छा येऊन पडली. आईस घरीं येण्यास उशीर लागलेला पाहून आचार्य लगेच नदीवर गेले. आईची ती भयप्रद स्थिति पाहतांच आचार्यांस फारच वाईट वाटलें. आईस सावध करून ते दोघेजण घरीं आले. आचार्य मनांत विचार करतात कीं, नदी लांब असल्यानें आईस पाण्याचे फार श्रम होतात. मातेचा दुःखभार हलका करून तिला सुखी करणें हें आपलें पुत्रकर्तव्य आहे. असें जाणून त्यांनीं श्रीगंगेची ललितपद्यांनीं स्तुती केली. त्या स्तवनानें संतुष्ट होऊन श्रीगंगामाता (नदी) दुसरे दिवसापासून प्रवाहरूपानें आचार्यांच्या घराजवळून वाहूं लागली.

ही कीर्ति सर्व प्रदेशावर पसरली. ती ऐकून केरला. धिप जो

राजशेखर नृपति, त्यानें आपल्या अमात्याबरोबर बहुमूल्य वस्त्रालंकार देऊन आचार्यांना आपल्या राजधानीला आणण्याकरितां मोठ्या इतमामानें पाठविलें. तो नम्रतेनें अचार्यांस येऊन भेटला. त्याचें योग्य तें स्वागत केल्यावर राजाचा निरोप ऐकून घेऊन पुढें आचार्य म्हणतात, पवित्र भिक्षान्नानें माझा निर्वाह होतो. अजिनाचें योगानें शीताचें निवारण व वस्त्रप्रावरणाची चिंता दूर होते, स्वधर्मकर्मानुष्ठानामुळें मला सतत समाधान वाटत आहे. तेव्हां तुमच्या राजाकडे येऊन मला काय मागावयाचें आहे ? तें ऐकून अमात्य परत राजाकडे गेला. अमात्याचे मुखानें आचार्यांचें वचन ऐकून राजशेखर स्वतः आचार्यांकडे आला. यथाविधि त्यानें आचार्यांची पूजा केली. व एक अयुतद्रव्य (दहा हजार सुवर्णनाणें ) आचार्यांस दक्षिणा म्हणून अर्पण केलें. नंतर प्रार्थनापूर्वक स्वतः केलेलीं तीन नाटकें त्यानें आचार्यांस भक्तिपूर्वक वाचून दाखविलीं. त्या त्याच्या भक्तीमुळें प्रसन्न होऊन व त्याचे इष्ट मनोरथ ओळखून आचार्यांनीं त्यास पुत्रप्राप्तीचा वर देऊन संतुष्ट केलें. मनोरथ सिद्धीस गेल्यामुळें राजशेखर फारच आनंदित झाला, व पुनश्च आचार्यांचें पूजन करून प्रमुदित चित्तानें आपल्या राजधानीकडे निघून गेला.

---

## प्रकरण चवथें

एकदां उपमन्यू, दधीची, गौतम व अगस्त्य इत्यादि ऋषि श्रीशंकराचार्यांना पाहण्याकरतां आले. अल्पवयांत झालेला कीर्तिपरिमल चहूंकडे पसरला होता. तेव्हां हा काय अद्भुत चमत्कार आहे हें पाहण्याकरतां मोठेमोठे पंडित व ऋषिवृंद आचार्यांकडे नित्य येऊं

लागले. उपरिनिर्दिष्ट ऋषी घरीं येतांच आर्यांबेस आनंद झाला व तिनें मधुपर्कपूर्वक त्यांची पूजा केली. ते ऋषी प्रसन्न आहेत असें पाहून आर्यांबा त्यास म्हणाली, भगवन्, माझ्या शंकराचें आयुष्य किती वर्षें आहे? तेव्हां अगस्त्य म्हणतात, तुमच्या या बुद्धिमान् व सर्वज्ञ मुलाचें आयुष्य सोळा वर्षांचें आहे. पण तुमचा मुलगा आणखी कांहीं अन्य उपायांनीं सोळा वर्षांचें जास्त आयुष्य मिळवील. असें सांगून व आचार्यांची भक्तिपूर्वक भेट घेऊन ते मुनिपुंगव निघून गेले. अगस्त्यऋषीच्या भाषणानें आपल्या मुलाचें आयुष्य फार थोडें आहे असें कळतांच आर्यांबेस फार वाईट वाटलें व ती शोकाकुल झाली. पतीच्या पश्चात् वैधव्य दुःखानें हें निंद्य जीवित कंठणें अतिशय कठीण; परंतु या लहान मुलाकडे लक्ष देऊन कसें तरी समाधान मानावयाचें, परंतु तोही अल्पायुषी. या विचारानें ती कष्टी झाली. आईचें सांत्वन करण्याकरितां आचार्य म्हणतात हे माते, तूं शोक कां करतेस? माझ्याकरितां शोक करणें वृथा आहे. या शोकाचा अंत कधींतरी होईल काय? हा दुःखमय संसार आहे. त्यांत अशीं इष्टानिष्ट सुखदुःखें प्राप्त होणारच. प्राणी जन्मतांच आपल्याबरोबर मृत्यूला घेऊन येतो. बरें तूं असें पहा कीं—

'नाहं तेषाममैतेनोऽन्यासेनोक्तमिदंवचः'

मातापितरें कोण कोणाचीं. मुलें तरी त्यांचीं कशीं? जन्मापुरता आलेला क्षणिक संबंध नित्य स्वरूपाचा आहे काय? नाहीं. तर हा सर्व भ्रम आहे, असत्य व अनित्य अशा मायापाशांत गुंतून व्यर्थ शोक करणें अज्ञपणाचें ठरेल. माझा तुझा अर्थाअर्थी कांहीं एक संबंध नाहीं. सर्व प्राणी अदर्शनापासून उत्पन्न होतात व अदर्शनांतच लीन होतात. खरोखर आखिल जगाला आधारभूत अशी एक ब्रह्मवस्तूच नित्य आहे, तेव्हां या सर्व मायाजालांतून

मुक्त होण्याकरतां मला तूं चतुर्थाश्रम स्वीकारण्याची अनुज्ञा दे. मुलाचें हें भाषण ऐकतांच आर्याबेचा शोक द्विगुणित झाला. व म्लान वदनानें ती म्हणते, बाळा, या वयांत हा विचार तुला योग्य दिसत नाहीं. प्रथम गृहस्थाश्रमाचा स्वीकार कर. यज्ञयागादिकें-करून सर्वत्रांचीं ऋणें फेड. व तदनंतर वाटल्यास तूं म्हणतोस तो आश्रम स्वीकार. मला एकटीला असहाय्य स्थितींत टाकून जाणें हें पुत्रधर्मास योग्य नव्हे. आचार्यांनीं आईची समजूत घाल-ण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; तरी त्याचा काहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हां आचार्य विचार करतात कीं, मी गृहस्थाश्रम तर घेणार नाहींच. त्याबरोबरच पण आईही संन्यासाला अनुमति देत नाहीं. ' नमातुर्दैवतंपरं ' आईवांचून दुसरें दैवत नाहीं. असें तर शास्त्र-वचन आहे. त्यामुळें आईची आज्ञाही मोडतां येत नाहीं, व माझा जन्म तर वेदांताचा उद्धार करण्याकरतांच झाला आहे. अशा परस्परविरुद्ध गोष्टींनीं माझें कार्य कसें होणार? याकरितां कांहीं तरी युक्ती योजिली पाहिजे, असें मनाशीं ठरवून आचार्य आपल्या नित्यो-द्योगास लागले. दुसरे दिवशीं आचार्य स्नानाकरतां गंगेवर गेले. गंगेंत स्नान करतांना नक्रानें त्यांचा पाय धरला. पायास वेदना फार झाल्यानें ते आई आई असें म्हणून मोठ्यानें रडूं लागले. मुलगा कां बरें रडतो, हें बघण्याकरतां आर्यांबा धांवून आली. मुलाची ती बिकट परिस्थिती पाहून आसपासही सहाय्य करण्यास कोणी नाहीं असें पाहातांच आर्यांबा मोठ्यानें आक्रोश करूं लागली. आपल्या मातेची ती कष्ट-प्रद स्थिती दिसतांच आचार्य आईस म्हणतात, आई तूं मला संन्यास करण्याची परवानगी देत असलीस तर हा नक्र माझा पाय निश्चित सोडील व माझा अपमृत्यूही टळेल. याउपर तुझी जशी मर्जी असेल तसें कर.

मी या वेळीं तर भयंकर संकटांत सांपडलों आहे. आर्यांबा विचार करते, मुलगा संन्यास कां करीना. पण जीव जाण्यापेक्षां संन्यास बरा. मग आईनें चतुर्थाश्रम घेण्यास आचार्यांस आज्ञा दिली. इकडे आचार्यांचा पायही नक्रानें सोडला. व आचार्य वरती आले. मुलगा संकटांतून वांचल्याबद्दल आईनें परमेश्वराचे उपकार मानून ती आपल्या बालकास प्रेमानें भेटली. पुढें आचार्य म्हणतात, मातोश्री, आपल्या पित्याचें जें कोणीं धन घेतात त्यांनीं आपल्या आईचा सांभाळ करावा, असें शास्त्रवचन आहे. तुला जेव्हां दुःख प्राप्त होईल त्यावेळीं तूं माझें स्मरण करतांच मी तुझ्याजवळ आहें असें समज. मला अनाथ टाकून माझा मुलगा निघुन गेला, असा शोक तूं करूं नकोस. तुझ्याजवळ राहाण्यापेक्षां लांब राहूनच मी शेंकडो-पटीनीं जास्त तुझें संरक्षण चांगल्या रीतीनें करूं शकेन. नंतर आचार्य आपल्या बांधवांस म्हणतात, मला चतुर्थाश्रम घेण्याची अत्यंत उत्कंठा प्राप्त झाली आहे. तर तुम्ही माझ्या मातेचा उत्तम प्रकारें सांभाळ करावा अशी माझी इच्छा आहे. या भरवशानें मी आईस तुमच्या स्वाधीन करीत आहें. बांधवांनीही या गोष्टीस अनुकूलता दर्शविली. आईचें सांत्वन करून व तिला भक्तिपूर्वक नमस्कार केल्यावर आचार्य आपल्या उद्दिष्ट कार्याकरितां घरांतून बाहेर पडले. मायेचें हें लौकिक बंधन सुटल्याबरोबरच आचार्यांचा संन्यास झाला, असें म्हणावयास हरकत नाहीं. मर्यादित जागेंत राहून त्यांचें कार्य साधलें नसतें. गृहदारादिक प्रपंचाकरतां ते अवतरले नव्हते, तर परमेश्वरप्रणीत वैदिक धर्मावर जें प्राणहारक संकट कोसळलें होतें त्याचें निवारण करून भारतवर्ष ज्ञानसंपन्न करणें याप्रीत्यर्थ त्यांचें अद्भुत चरित्र व्हावयाचें होतें, म्हणून ते सर्वस्वाचा त्याग करून बाहेर पडले.

नर्मदेच्या प्रशांत व रम्य अशा तीरानें जातांना आचार्य श्री-गोविंद पूज्यपादांचा आश्रम शोधूं लागले. एका ऋषीनें या अरुंद द्वारानें आंत जा म्हणजे तुम्हांस श्री गोविंदगुरु भेटतील असें सांगतांच आचार्य आंत गेले, व त्यांनीं लांबूनच श्रीगोविंद-पादांना साष्टांग नमस्कार घातला. आणि त्यांचे सद्‌गदित वाणीनें ते स्तवन करूं लागले. स्तवनानें प्रसन्न होऊन नेत्र उघडून श्रीगोविंदयती विचारतात कीं, हे वत्सा, तूं कोण आहेस व तुझें काय कार्य आहे ? तेव्हां नम्रपणें आचार्य म्हणाले:—

मनोबुद्ध्यहंकार चित्तानि नाहं नच श्रोत्रजिव्हा नच घ्राण नेत्रं ।
नच व्योम भूमि:न तेजो न वायु: चिदानंदरूप: शिवोहं शिवोहं ।

मन, बुद्धि, अहंकार, चित्त, श्रोत्र, जिव्हा घ्राण, नेत्र, आकाश, वायु, भूमी, तेज यापैकीं मी कोणीही नाहीं, तर केवळ सच्चिदानंद स्वरूप असा आहे. या भाषणानें प्रत्यक्ष श्रीशंकरच या बटुवेषानें आले आहेत असें दिव्य दृष्टीनें जाणून श्रीगोविंदपादांनीं आचार्यांकडून तेथें असलेल्या श्रीपादुकांची पूजा करविली. नंतर चतुर्थाश्रमाची दीक्षा दिल्यावर शाश्वत व अद्वैत अशा ‘ अद्वैत ब्रम्हाचा तत्वमस्यादि ’ महावाक्यांनीं आचार्यास उपदेश केला. श्रीगोविंदपाद एकदां ध्यानस्थ असतां नर्मदेस महापूर आला. त्या योगानें प्रचंड असा दीर्घ ध्वनी नदीचा होत होता. या नादानें आपल्या गुरुजींच्या समाधीचा भंग होईल या भीतीनें आचार्यांनीं आपल्या कमंडलू-तील थोडेसें उदक अभिमंत्रण करून नदीवर प्रोक्षण केलें. चमत्कार असा कीं एवढी मोठी प्रचंड तुफान झालेली नर्मदा नदी. पण ती शांत होऊन प्रवाहरूपानें आचार्यांच्या कमंडलूंत येऊन सामावली. एवढें अफाट पाणी पण तें सर्व कमंडलूंत राहिलें. पुढें

ही गोष्ट गुरुजींस समजल्यावर त्यांना फारच आनंद झाला. ते आनंदून आचार्यांस म्हणाले, स्थितप्रज्ञ अशा हे श्रेष्ठ शिष्यवरा, तुला शरदृतूंतील स्वच्छ चंद्रप्रकाशाप्रमाणें स्वतः सिद्ध असें आत्मज्ञान आहे. तूं आतां श्रीक्षेत्र वाराणशीस जा, आणि तेथील मुमुक्षुजनांस तत्वज्ञानाचा उपदेश करीत तेथेंच रहा. एवढें बोलून श्री गोविंदपाद आचार्यांस एक पूर्वींचा वृत्तांत सांगू लागले. ‘ पूर्वी हिमालयावर मुनींच्या महासभेंत श्री वेदव्यास वेदांतावर प्रवचन करीत होते. त्यावेळीं मीं व्यासांना विचारिलें कीं, आपण सर्व वेदांचे विभाग केले. भारतादि महाग्रंथ, ब्रह्ममीमांसा व योग-भाष्यही लिहिलें. या सर्व श्रेष्ठ तत्वज्ञानाचा अर्थ कांहीं लोक विपरीत करीत आहेत. यास्तव आपण स्वतः हा विपरीत परिणाम टाळण्याकरतां वेदनिर्णायक असें एक भाष्य तयार करा. त्यावर भगवान् व्यास मला म्हणाले, आपण विचारलेला हा प्रश्न पूर्वींच देवांनीं श्रीशंकरास विचारला होता. तेव्हां भगवान् श्रीशंकरांनीं मी स्वतःच अवतार घेऊन हें कार्य करीन असें सांगितलें. व आपल्या कमंडलूंत नर्मदा नदीचें सर्व उदक जो भरून दाखविल अशा तुमच्या शिष्याकडूनच वेदार्थ प्रकाशक असें भाष्य होणें शक्य आहे असें व्यास मला म्हणाले. श्री गोविंदयती पुढें म्हणतात, हे भिक्षो, उपरिनिर्दिष्ट पूर्व संकेतावरून तूंच हें कार्य कर. व तत्त्व-ज्ञानोपदेश करून जगाचा उद्धार करण्यास काशीस जा. तेथें श्री काशीविश्वेश्वर तुला प्रत्यक्ष दर्शन देईल. इतकें सर्व भाषण झाल्यावर गुरुजींस नमस्कार करून आचार्य काशीस गेले. त्यांनीं तेथें गेल्या-वर ‘ शिवा शान्ताकारं हरिहर निजावास धरणीं ’ या श्लोकानें ग्रामदेवतेची स्तुती केली. गंगेवर जाऊन शास्त्रविधीप्रमाणें स्नानादि सर्व ब्रह्मकर्म करून गंगेची प्रार्थना केली, श्रीकाशीश्वराचे मांदिरांत

मानसिक विधीनें त्यांनीं श्रीकाशीनाथाचें पूजन केलें, श्रीशंकराची ‘ शिवाशांताकारं भवभृति जरा शून्य मरणं ’ या श्लोकानें व ‘ शिवां शंकरस्यार्ध देहां विशुद्धां ’ इत्यादि सुभाषितांनीं अन्नपूर्णेची स्तुति केली. श्रीकाशीनाथाचें सहपरिवारें पूजन करीत, मोक्षदायक व पुण्यपावन श्रीकाशीक्षेत्रांत श्रीशंकराचार्य आनंदानें कालक्रमण करूं लागले.

---

## प्रकरण पांचवें

चौलप्रांतांतील विषयरूपी विषयानें ग्रस्त झालेला, संसारापासून विरक्त झालेला एक ब्राम्हण दीन वदनानें आचार्यांचेकडे आला. त्याची सात्विक वृत्ती अवलोकन करून आचार्यांनीं त्यास शिष्य केलें व त्याचें सनंदन असें नांव ठेविलें. तोच पुढें पद्मपाद या नांवानें प्रसिद्धीस आला. तसेंच चित्सुक, आनंदगिरी, इत्यादि शिष्यवृंद वट वृक्षाखालीं आचार्यांची सेवा करीत राहिले. ते सर्व सनंदनाप्रमाणें विरक्तच होते. श्मश्रू व दाढी वाढलेले असे वृद्ध शिष्य आणि अगदीं तरुण असे गुरु श्रीशंकराचार्य असा हा आश्चर्यकारक समागम चित्ताल्हादक व नयनमनोहर होता. खालीं दिलेल्या श्लोकांत त्याचें यथायोग्य स्वारस्य आढळतें.

चित्रं वटतरोर्मूले वृद्धाः शिष्या गुरुर्युवा
गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यास्तुच्छिन्नसंशयाः।

एकदां आचार्य स्नानास गंगेवर जात असतांना, चार कुत्रीं बरोबर घेऊन एक चांडाल समोरून येत होता. तो अगदीं जवळ आल्यामुळें आचार्य त्यास म्हणतात. अरे जरा बाजूला हो. मला स्पर्श करूं नकोस. असें आचार्यांचें भाषण ऐकतांच स्मितपूर्वक तो चांडाल म्हणतो, हे यतिमहाराज, वेदांतसिद्ध, न्याययुक्त असें

आपलें सांगणें आहे यांत संशय नाहीं. आपलें अंतःकरणही उदार आहे. पण आत्मसुख हें संगरहित असतांना तूं व मी असा भेद-भाव आपण दर्शवितां हें विचित्र नव्हे काय ? काषायवस्त्रें धारण करणारे तुझ्यासारखे पुष्कळ संन्याशी लोकांना नानाप्रकारें फस-वीत असतात. बरें आतां तूं जें मला बाजूला हो असें म्हणालास तें या देहीला (आत्म्याला) किंवा देहाला. तर दोन्ही पक्षीं तुझें म्हणणें यथार्थ होत नाहीं. अन्नमय पार्थिव शरिराला—देहाला उद्दे-शून तुझें म्हणणें असेल, तर तुझें जसें शरीर तसेंच माझेंही शरीर आहे. देही (आत्म्याविषयीं) विषयीं असेल तर तो सर्वत्र एकरूप असल्यानें हा ब्राम्हण व हा अंत्यज, असा भेद त्याचे ठिकाणीं संभवत नाहीं. मदिरा व गंगा जरी पृथक् असली तरी त्यांत प्रति-बिंवित झालेलें सूर्यबिंब हें एकच असतें. ' त्याप्रमाणें शरीरें जरी निरनिराळीं असलीं तरी आत्मा हा एकच आहे. मग मी चांडाळ व तूं ब्राह्मण असें कसें म्हणतोस ? शरीरांत पुराणप्रसिद्ध व सच्चिदा-नंद स्वरूप असलेला असा आत्मा त्याला विसरून तूं देहाविषयीं वृथाभिमान कां धरतोस ? कोणीकडे ही पुण्यपवित्र काशी नगरी, व कोठें हा जनतेस ठकविणारा तुझा संन्यास वेष. हा सर्व मायेचा प्रभाव असल्यानें मोठे मोठे पंडितही मोहित होऊन भ्रम पावतात तेथें तुझी प्रतिष्ठा काय ! त्या चांडालाचें हें अद्वैतपर भाषण आचार्यांनीं शांत चित्तानें ऐकून घेतलें व ते म्हणाले, बाबारे, तूं जें हें तत्वज्ञान सांगितलेंस तें सर्व खरें आहे. सर्व शास्त्रपारंगत असे अनेक पंडित जगांत आहेत. परंतु तत्त्व जाणणारे क्वचितच सांपडतील.

तेथेंच आचार्यांनीं ' मनीषापंचक स्तोत्र ' केलें. त्याबरोबर त्या चांडालाचे स्थानीं वेदचतुष्टयांनीं युक्त असे साक्षात् श्रीभग-

आन् काशीविश्वेश्वर प्रकट झाले. आचार्यांनीं अत्यंत भक्तिभावानें नमस्कार करून त्यांचें स्तवन केलें. प्रसन्नचित्तानें श्रीशंकर आचार्यांस म्हणतात,दुष्ट लोकांनीं वेदांचे विपरीत अर्थ प्रसृत केले आहेत. तूं सर्वशक्ती व सर्वज्ञ असल्यामुळें सर्वश्रुति परब्रह्मनिष्ठ होतील असें वेदांतसूत्रावर अद्वैतपर भाष्य कर. तसेंच श्रुतींतील सूत्रें व इतिहास यावर भाष्य लिहून अद्वैत संप्रदायतत्त्ववेत्त्यांचा मार्ग निष्कंटक कर. तुझ्या भाष्याचा सर्वत्र प्रसार होऊन ब्रह्मदेवाच्या सभेंतही त्याचा गौरव होईल. अत्यंत कर्मठ मंडनमिश्र, प्रभाकर, शैवनीलकंठ शाक्त गुप्तादि प्रभाकर, व वेदतस्कर असा भास्कर या प्रबळ वाद्यांनां जिंकून माझ्या अद्वैत तत्त्वज्ञानाचा प्रसार कर. इतकें सांगून भगवान् श्रीशंकर गुप्त झाले. परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें आचार्यांनीं ईशादि दशोपनिषदांवर भाष्य लिहिलें. ( उपनिषदें–ईश, केन, कठ, प्रश्न, मुंडक, मांडूक्य, ऐतरेय, तैतरेय, छांदोग्य व बृहदारण्यक ) व शिष्यांसही उपनिषदें सांगितलीं. नंतर गीताभाष्य व नानाप्रकारची स्तोत्रें लिहिलीं. एकदां सनंदनशिष्य गंगेच्या परतीरावर उभा होता, त्यास आचार्यांनीं हांक मारली. गुरूंची हांक ऐकून सनंदन मनांत विचार करतो कीं,गुरुभक्ती ही केवळ लोकांनां संसारसागरांतूनच तारते कां नदीवरूनही तरून नेते. इ० विचार करून व गुरुचरणाचें ध्यान करून सनंदन नदीवरून चालूं लागला. गंगेनें त्याची गुरुनिष्ठा पाहून सनंदनाच्या प्रत्येक पावलाखालीं कमल उत्पन्न केलें. तसाच गुरुभक्तिबलाच्या योगानें नदीवरून सनंदन चालतच गुरूकडे आला. त्याला प्रेमानें आलिंगन देऊन आचार्यांनीं त्याचें यथायोग्य पद्मपाद असें नांव ठेविलें. आचार्यांच्या अद्वैतपर भाष्यावर कांहीं कुतर्कवादी पंडितांनीं आक्षेप घेतले. परंतु आचार्यांनीं त्यांच्या मताचें युक्तिप्रयुक्तीनें निरसन केल्यावर, ते पंडित

स्वमत टाकून आचार्यांचे शिष्य झाले. समन्वय, अविरोध, साधन व फल अशा चतुर्लक्षणांनीं युक्त असें ब्रम्हसूत्र भाष्य लिहिलें. शिष्य मंडळीस पाठ सांगत असतां आचार्यांचेकडे एक वृद्ध ब्राह्मण आला, व म्हणाला, व्यासप्रणीत ब्रम्हसूत्रावर तुम्हीं भाष्य लिहिलें आहे असें ऐकतों. तर त्या सूत्रांचा अर्थ तुम्हांला तत्वतः येत असेलच. तृतीयाध्यायाच्या प्रारंभीं असलेल्या 'तदन्तरप्रतिपत्तौ' इत्यादि सूत्रांचा अर्थ सांगा पाहूं. आचार्यांनीं त्याचा यथाज्ञात अर्थ लावला. त्यावर त्या वृद्ध ब्राह्मणानें शतशः विकल्प केले. आचार्यांनीं त्या विकल्पांचें सहस्र तऱ्हेनें खंडन केलें. हा वाद आठ दिवस चालला होता. तेथें हजर असलेले पद्मपादमुनि आचार्यांस, म्हणाले, महाराज वृद्ध ब्राह्मणाचे रूपानें आलेले हे सूत्रकार प्रत्यक्ष भगवान् वेदव्यास आहेत व आपण तर साक्षात् श्रीशंकर आहांत. आपणा उभयतांच्या वादामधें आम्हां अज्ञशिष्यांस काय बरें समजतें आहे. आचार्यांचें तें दिव्यज्ञान अवलोकन केल्यावर त्या वृद्ध ब्राह्मणानें मूळ आपल्या श्रीव्यास स्वरूपांत श्रीशंकराचार्यांस दर्शन दिलें. आचार्यांनीं योग्य प्रकारें पूजा करून व्यासांचा गौरव केला. श्रीव्यास पुढें म्हणतात, हे स्वामिन्, तुमच्या या अगाध प्रतिभेनें मी संतुष्ट झालों. तुमचें पांडित्यही अखंड आहे. तुम्हीं केलेल्या भाष्याचें अभिनंदन करण्याकरतां व प्रत्यक्ष दर्शनाकरतां मी आलों होतों. आचार्य पुढें म्हणाले, सर्व उपनिषदांवर मीं भाष्यें लिहिलीं. शिष्यवर्गास ती शिकविलीं. व विरुद्ध वाद्यांचें निःशेष खंडन केलें. मला आतां कांहीं कर्तव्य उरलें नाहीं, व माझ्या आयुष्यसमाप्तीचा काळही समीप आला आहे. तरी आपण क्षणभर थांबावें. मी या जड शरीराचा आपल्या समक्ष गंगेंत त्याग करतों. या गोष्टीचें निवारण करून व्यास म्हणतात, पृथ्वीवर अजूनही प्रबल असे महान् पंडित आहेत. त्यांचें

खंडन करण्याकरतां तुम्ही आणखी कांहीं दिवस या भूतलीं वास करावा. तुमचें आयुष्य जरी संपलें असलें तरी मी सोळा वर्षें तुम्हांस अधिक आयुष्य देतों. त्या कालांत अद्वैतमताचा प्रसार करून तत्प्रीत्यर्थ शिष्यशाखा वाढवा. इतकें सांगून श्रीव्यास अंतर्धान पावले. व्यासांच्या आज्ञेनें आचार्य दिग्विजयास प्रवृत्त झाले. कुमारिलभट्टास जिंकण्याच्या निमित्तानें विंध्याद्रि पर्वताकडे निघाले. जातांनां वाटेंत प्रयागला त्रिवेणी संगमावर स्नान करून आचार्य जात होते. महामीमांसक कुमारिलभट्टाची लोकविश्रुत कीर्ति चहूंकडे ऐकूं येत होती. मार्ग काढीत असतांना तुषाग्नीमध्यें ( कोंड्याच्या राशीस अग्नि लावून त्यांत प्रवेश करणें ) प्रवेश केलेला अत्यंत विद्वान कुमारिलभट्ट आचार्यांस दिसला. प्रखर अग्नींत प्रवेश केलेल्या तशा स्थितींतहा आचार्य आलेले पाहून कुमारिलभट्टानें शिष्यांकरवीं त्यांची पूजा केली. कुमारिलभट्टास वांचविण्याकरतां आचार्य अभिमंत्रित केलेलें उदक अग्नीवर शिंपडणार इतक्यांत या कृत्यास प्रतिबंध करून कुमारिलभट्ट सांगतो, हे श्रेष्ठ यते, तुम्हीं केलेलें भाष्य मला समजलें. त्यावर वार्तिक करावें अशी मला इच्छा आहे. परंतु आतां तें कार्य माझे हातून होणें शक्य दिसत नाहीं. माझ्याकडून दोन दोष घडले आहेत. बौद्धाजवळ त्यांचें तत्त्वज्ञान समजण्याकरतां वेषांतर करून अध्ययन केलें, व बाहेर येऊन पुनश्च आपल्या वैदिक धर्मास मिळालों. यामुळें बौद्धांचा सांप्रदाय विच्छिन्न झाला. हा गुरुहत्त्या दोष पहिला. व जैमिनीमतानें युक्त होऊन केवळ कर्मकांडानें मुक्ती मिळते, परमेश्वर कांहीं करीत नाहीं, तो तटस्थ आहे, असें मत मी प्रतिपादन करीत आलों हा दुसरा मोठा दोष. बुद्धिपूर्वक केलेल्या या दोन दोषांला देहदंडाशिवाय अन्य प्रायश्चित्त नाहीं. शाबर भाष्याप्रमाणें शंकर भाष्यावर वार्तिक कर-

ण्याचें पुण्य माझ्या नशिबांत दिसत नाहीं. असो. पण माझा प्रतिसूर्य कर्मठ शिष्य मंडनमिश्र याला वादांत तुम्हीं जिंकलें म्हणजे तुमचा सर्वत्र विजय होईल. कुमारिलभट्टाचें हें भाषण श्रवण केल्यावर, त्यास अद्वैतब्रह्माचा उपदेश करून आचार्य मंडनमिश्र पंडिताकडे यावयास निघाले.

---

## प्रकरण सहावें

मंडन पंडितानें मंडित झालेल्या माहिष्मती (महेश्वर, सं. इंदूर) नगरीला आल्यावर आचार्यांनीं श्रीरेवा ( नर्मदा ) नदीचें स्नान केलें, व आपलें नित्य आन्हिक संपविलें. नंतर ते चौकशी करीत मंडनमिश्राच्या घराकडे चालले. वाटेंत मंडनमिश्राच्या घरच्या दासी भेटल्या. ज्या घरांत ' स्वतःप्रमाणंपरतः प्रमाणं फलप्रदंकर्म फलप्रदोजः । जगध्द्रुवंस्यात् जगद्ध्रुवंस्यात् ' । वेदांना स्वतः प्रामाण्य आहे काय ? कां परतः प्रामाण्य आहे ? फल देणारें कर्म आहे का ईश्वर आहे ? जग हें सत्य किंवा मिथ्या ? इत्यादि वाक्यें शुकस्त्रिया दारांतच म्हणतांना दिसतील तें घर मंडनमिश्राचें समजा, अशी खूण सांगून त्या दासी निघून गेल्या. मंडनमिश्राच्या दासी व पक्षीही संस्कृत श्रेष्ठ तत्त्वज्ञान बोलतात हें ऐकून आचार्यांस आश्चर्य वाटलें. वर सांगितलेली खूण पाहात आचार्य मंडनमिश्राच्या दाराजवळ आले. परंतु दार बंद होतें. त्यामुळें घरांत जाण्यास मार्ग सांपडेना. शेवटीं योगबलानें आकाशमार्गें शंकराचार्य मंडनमिश्राच्या घरामध्यें एकदम प्रविष्ट झाले. त्या ठिकाणीं विद्येच्या तेजानें युक्त असलेल्या मंडनमिश्रास जैमिनी व व्यास यांचे चरण प्रक्षालन करीत असतांना आचार्यांनीं पाहिलें. कारण त्या दिवशीं मंडनमिश्राकडे श्राद्धकर्म होतें. अवेळीं

आलेल्या संन्याशास पाहून मंडनमिश्र अतिशय संतापला. तेव्हां उभयतांची जीं गूढार्थ गर्भित प्रश्नोत्तरें झालीं तीं विशेष उद्‌बोधक वाटल्यावरून पुढें देत आहें.

मंडनमिश्र–‘ कुतोमुंडी ’ हे संन्याशा, तूं कोठून आलास ? ( आचार्यांनीं त्याच्या प्रश्नाचा अर्थ असा केला कीं, तूं मुंडन कोठपर्यंत केलें आहेस. या विचारानें ) आचार्य–‘ आगलान्मुंडी ’ गळ्यापर्यंत मुंडन केलें आहे. मंडनास वाटलें कीं, याला माझ्या प्रश्नाचा अर्थ समजला नाहीं. तेव्हां तो पुनश्च आचार्यांस म्हणतो.

मंडन०–‘ पंथास्तेपृच्छते मया ’ तूं कोणच्या मार्गानें आलास हें मी तुला विचारतों. तूं मुंडन कोठपर्यंत केलें आहेस हें मीं तुला विचारलें नाहीं. मंडनमिश्राच्या वचनाचा तुझ्या मार्गाला मी प्रश्न विचारतों असा अर्थ घेऊन,

आचार्य०–मार्गाला तूं प्रश्न केलास तेव्हां ‘ किमाह: पंथा: ’ मार्गानें तुला काय उत्तर दिलें ?

असें विपरीत वाक्य ऐकून जास्त त्रासून–

मंडन०–‘ त्वन्मातामुंडा ’ असें संतापानें म्हणाला.

आचार्य०–मार्गानें तुला सत्य सांगितलें. कसें, तर मार्गाला तूं विचारलेंस. तेव्हां प्रश्न करणाऱ्या तुला ‘त्वन्मातामुंडा ’ असें मार्गाकडून योग्य उत्तर मिळालें. प्रश्न न विचारणाऱ्या मला हें उत्तर योग्य दिसत नाहीं. तरी तूं विचारलेला त्वच्छब्द मद्वाचक कधींही होणार नाहीं.

मंडन०–‘ अहो पीताकिमुसुरा’

आचार्य०–दारू पिवळी नसून पांढरी आहे.

मंडन०–तूं दारूचा वर्णही जाणतोस काय ?

आचार्य०–मी तर केवळ रंगच जाणतों पण तूं रसही जाणतोस.

मंडन०—' कंथां वहसि दुर्बुद्धे गर्दभेनापिदुर्वहाम् ।
शिखा यज्ञोपवीताभ्यां कस्ते भारोभविष्यति ।

आचार्य०—कंथां वहामि दुर्बुद्धे तवपित्रापिदुर्वहाम् ।
शिखायज्ञोपवीताभ्यां श्रुतेर्भारोभविष्यति ।

मंडन०—लग्न करून पत्नीचें रक्षण करण्यास असमर्थ असा तूं लग्न न करतां संन्यास केलास, व शिष्यांचा समुदाय आणि पुस्तकांचा व्यर्थ भार वाहणाऱ्या तुझी ब्रम्हनिष्ठा मला दिसतेच आहे.

आचार्य०—गुरुशुश्रूषेमध्यें तत्पर व स्त्रीसेवेंत निमग्न असलेल्या तुझीही कर्मनिष्ठा मला समजली.

मंडन०—स्त्रियांच्या गर्भांत नऊ महिने राहिलेल्या व स्त्रियांनींच रक्षण केलेल्या असा तूं स्त्रीजातीची अवहेलना करतोस.

आचार्य०—ज्यांचें तूं दूध प्यालास त्या स्त्रीवर्गाशीं संग करून त्यांच्याशीं तूं रममाण होतोस.

मंडन—तिन्हीं अग्नींचा त्याग केलेल्या तुला वीरहत्त्या व इंद्रादि हत्त्यांचें पातक लागलें आहे.

आचार्य०—परब्रम्हास न जाणणाऱ्या तुला मात्र आत्महत्येचें पातक लागलें आहे.

मंडन०—द्वारपालांना फसवून तूं चोरासारखा गृहांत कसा बरें आलास ?

आचार्य०—याचकांना अन्न न देतां द्वारें लावून तूं चोरासारखा अन्न कसा बरें खातोस ?

मंडन०—' कर्मकाले न संभाष्य अहंमूर्खेंपण संप्रति ' या पवित्र कर्माच्या वेळीं मूर्खाशीं संभाषण करणें मला योग्य वाटत नाहीं.

आचार्य०—या भाषणानें तुझें पांडित्य प्रकट होऊन तूं यतिभंग मात्र केलास.

मंडन०—संन्यासवृत्तीचा विध्वंस करण्यास अवतरलेल्या मला, यतीचा भंग केल्यास कांहीं दोष लागणार नाहीं.

आचार्य०-संन्याशापासून झालेल्या पराजयांत कांहीं दोष नाहीं, हें तुझें म्हणणें बरोबर आहे.

मंडन०—ब्रह्म कोणीकडे, व संन्यासवेष धारण करणारा हा कुबुद्धी कोणीकडे ? मिष्टान्न भोजनाकरतांच यानें हा वेष घेतलेला दिसतो. काय हा कलियुगाचा महिमा !

आचार्य०—स्वर्ग कोठें, व हा कर्मठपणाचा दुराचार कोठें ? अग्निहोत्र म्हणजे काय, केवळ स्त्रियांचा उपभोग घेण्याकरतांच यानें हा कर्मठाचा वेष घेतला आहे. काय हा कलियुगाचा महिमा ?

याप्रमाणें त्यांचा वादविवाद चाललेला पाहून मध्येंच श्री. व्यास म्हणतात, मंडना तूं जें या यतीला टाकून बोललास तें फार अनुचित झालें. कारण तो साक्षात् विष्णूच या यतिवेषानें येथें प्राप्त झाला आहे. तर तूं त्यास निमंत्रण कर. या व्यासवचनावर विश्वास ठेवून मंडनमिश्रानें आचार्यांची शास्त्रोक्त पूजा करून भिक्षेविषयीं प्रार्थना केली. तेव्हां आचार्य म्हणाले, मला अन्नाची भिक्षा नको, तर वादभिक्षा दे. वादांत जो पराजित होईल त्यानें विजयी वाद्याचें शिष्यत्व स्वीकारावें. मी सर्वत्र वेदांतमताचा प्रसार करीत आहे. तरी माझे सिद्धांत सत्य व उत्तम म्हणून त्यांचा अंगिकार कर. किंवा मान्य नसल्यास वादविवाद कर. नाहींतर मी हरलों असें तरी कबूल कर. तें आचार्यांचें भाषण ऐकतांच आश्चर्यानें मंडनमिश्र म्हणतो, वेदाभिप्रेत कर्ममार्ग सोडून या संन्याशानें कल्पिलेल्या अन्य मार्गाचा मी कदापि स्वीकार करणार नाहीं. प्रत्यक्ष शेषानें येऊन सहस्रमुखांनीं जरी मला सांगितलें, तरी मी जिंकलों गेलों असें कधींही कबूल करणार नाहीं. खरोखर आज

वाद करण्याचा सुदिन आला असल्यानें मी त्रिवार धन्य आहें. विजयश्रीचा जयमहोत्सव आज आपण होऊन मजकडे चालत आला आहे. अगणित शास्त्रांचें केलेलें परिशीलन आज मला फलद्रूप होवो. उद्यां आपण वादास सुरवात करूं. याप्रमाणें भाषणें झाल्यावर वादास मध्यस्थ कोण करावा याची चर्चा झाली. जैमिनीनें सांगितलें कीं, मंडन पंडिताची भार्या सरस्वतीच हें काम उत्तम करील याप्रमाणें ठरलें. त्या दिवशीं श्राद्धकर्म संपल्यावर व्यास जैमिनी गुप्त झाले. दुसरे दिवशीं ठरल्याप्रमाणें वादास प्रारंभ झाला. सरस्वती मध्यस्थ झाल्यावर आचार्यांनीं पुढील प्रतिज्ञा केली. 'ब्रह्म ही एकच नित्य वस्तु आहे, व सर्व जगत् हें मिथ्या आहे, हा विषय प्रतिपादन करतांना जर माझा पराजय झाला तर कर्ममार्ग स्वीकारून मी गृहस्थाश्रमी होईन.' मंडनमिश्रानेंही आपली प्रतिज्ञा उच्चारली— 'कर्मानेंच मुक्ति मिळते' हा माझा निश्चित् सिद्धांत आहे. तो प्रतिपादन करतानां मी जर हरलों गेलों, तर तुम्हीं केलेल्या प्रतिज्ञेच्या उलट म्हणजे कर्ममार्ग सोडून मी चतुर्थाश्रमाची दीक्षा घेईन.'

ज्याच्या गळ्यांतील माळ आधीं सुकेल तो जिंकला गेला हें समजण्याकरितां शारदेनें ( सरस्वतीनें ) दोघांच्याही गळ्यांत फुलांचा एक एक हार घातला.

वाद सुरू झाल्यावर अंतरिक्षांत देव—गंधर्वांची व वादस्थळीं विद्वान लोकांची भयंकर गर्दी झाली. मुद्देसूद व निर्वाणीच्या वीरश्रीनें तो वाद सारखा पंधरा दिवस कडाक्यानें झाला. वादाचे शेवटीं मंडन०—तुमच्या मताला पुष्टिकारक अशीं प्रमाणवाक्यें तुमच्याजवळ नाहींत. तेव्हां आचार्य म्हणाले,—तत्वमस्यादि श्रुतिवाक्येंच याला प्रमाण आहेत. यावर त्या श्रुतिवाक्याचेंही मंडन-

मिश्रानें नानाप्रकारचे विकल्प केले. त्या विकल्पाचें आचार्यांनीं निरनिराळ्या तर्कपद्धतीनें योग्य प्रकारें खंडन केलें. शेवटीं आचार्यांच्या तर्कशुद्ध युक्तिवादाला अनुमोदन देऊन पंडित मंडनमिश्रानें आचार्यांस साष्टांग नमस्कार घातला. मंडनमिश्राच्या गळ्यांतील हार यावेळीं सुकला होता. रोज वाद चालू असतां माध्यान्ह समयीं सरस्वती भोजनाकरतां मंडनमिश्रास भोजनास चला असें म्हणत असे व आचार्यांस भिक्षेस चला, असें विनवी. यावेळीं सरस्वती दोघांसही भिक्षेस चला असें म्हणाली. कारण यावेळीं मंडनाचा पूर्ण पराभव झाला होता. सर्वत्रांचें भोजन झाल्यावर सरस्वती म्हणते, पूर्वीं माझेकडून कांहीं अपराध झाला होता, त्यामुळें अति कोपानें दुर्वासमुनींनीं मला पृथ्वीवर मंडनमिश्र पंडितांच्या घरीं तूं वास करशील असा शाप दिला. शापाची मुदत तुम्ही ज्यावेळीं विजयी व्हाल तो समय सांगितला. तो सुदिन आज उगवला आहे. तरी मी आपली (आचार्यांची) आज्ञा घेऊन स्वस्थानीं जातें, असें म्हणून सरस्वती जावयास निघाली. आचार्यांनीं अरण्यदुर्गा मंत्रानें तिला थांबविलें, व ते तिला म्हणाले, मीं तुला जाण्याची परवानगी देईन तेव्हां तूं जा. आपली जशी आज्ञा, असें म्हणून सरस्वती राहिली. पुनश्च मंडनमिश्र आचार्यांस म्हणतो, वादामध्यें मी पराभूत झालों म्हणून मला तितकेंसें वाईट वाटत नाहीं. परंतु सर्वज्ञतेस पात्र असलेल्या जैमिनी मुनींच्या सूत्राचें खंडन झालें याबद्दल मला अती विषाद होत आहे. आचार्य म्हणतात, तुला जैमिनींच्या सूत्राचा अभिप्रायच कळला नाहीं असें वाटतें. सर्व शंकांचें पुनश्च निरसन झाल्यावर मंडनमिश्र जैमिनी मुनींसच प्रत्यक्ष भेटून आला, व सर्वतोपरी विजयी झालेल्या आचार्यांस तो अखेर शरण गेला, व त्यांचा शिष्य झाला. हें वृत्त पाह-

तांच सरस्वती म्हणते,मला असें वाटतें कीं,माझ्या पतीचा पूर्ण पराभव कांहीं झाला नाहीं. कारण पतीचें अर्धें अंग स्त्री हें आहे. तेव्हां मला जिंकल्याशिवाय तुम्ही विजयी झालात हें म्हणणें संभवत नाहीं. पुढें आचार्यांचा व सरस्वतीचा सतरा दिवसपर्यंत सारखा वाद चालला होता. तोही अपूर्व असाच झाला. आचार्य हार जाण्याचें चिन्ह जेव्हां कांहीं दिसेना,तेव्हां सरस्वती विचार करते कीं,आचार्य शास्त्रविद्येंत माझ्यापुढें हार जाणें शक्य दिसत नाहीं. परंतु विवाह न करतां बालपणींच यांनीं संन्यास केल्यामुळें यांच्यावर कामशास्त्रांत मला विजय मिळवितां येईल.या भावी विजयी भावनेनें सरस्वतीनें पुन्हां निग्रहानें वादास प्रारंभ केला. सरस्वती म्हणते, मदनाच्या किती कला आहेत, त्यांचें स्वरूप कसें आहे, त्या कामकला कशाचा आश्रय करून रहातात, लहानपणी त्यांची कशी स्थिति असते, स्त्री–पुरुषांच्या ठिकाणीं मदनाची वेगवेगळी कशी अवस्था असते, वगैरे. या प्रश्नांची अनपेक्षित मालिका ऐकून आचार्य स्वगत विचार करतात कीं, या प्रश्नांचीं समर्पक उत्तरें जर दिलीं नाहींत, तर पराजय होणार व तोही एका स्त्रीकडून झाला हा कमीपणा येणार. बरें, उत्तरें द्यावीं, तर ब्रह्मचर्यावस्थेंत घेतलेल्या संन्यासधर्माचा क्षय होणार. ( असा विचार करतां सर्वज्ञ अशा व प्रत्यक्ष श्रीभगवान् शंकरच शंकराचार्य या रूपानें अवतीर्ण झाले असल्यामुळें त्यांना कोणचा विषय अगम्य होता? पण लौकिक व्यवहाराची अडचण दूर करण्याकरतां हा सर्व मानवी प्रकार करणें भाग पडलें. ) थोडासा विचार करून आचार्य म्हणतात, हे शारदे, मला एक महिन्याचा अवधि दे. म्हणजे मग मी तुला या सर्व प्रश्नांचीं योग्य उत्तरें देईन. सरस्वतीनें अनुमति देतांच आचार्य तेथून निघाले, व जातांना पद्मपादादिक शिष्यांना ते म्हणाले, जोंपर्यंत मला कामकलेचें ज्ञान प्राप्त

झालें नाहीं, तोंपर्यंत माझें शरीर या गुहेंत नीट जतन करून ठेवा. असें सांगून गुहेंत देहाचें विसर्जन करून मृत झालेल्या अमरकराजाच्या कलेवरांत पायाच्या अंगुलीच्या द्वारानें आचार्यांनीं योगबलानें प्राण-स्वरूपानें प्रवेश केला. एकाएकीं अमरक राजा सजीव झाल्याचें दृश्य दृष्टीस पडतांच कांहीं जणांस आनंद व कांहीं लोकांस आश्चर्य वाटलें. प्रधानादि सुज्ञ मंडळीस मात्र कोणातरी बलिष्ठ योग्याचा हा खेळ आहे असेंच वाटलें. आपला देह कोठेंतरी सुरक्षित ठेवून या राजशरीरांत योग्यानें आपला प्रवेश केला आहे अशी त्यांची कल्पना झाली. आपलें इच्छित कार्य झाल्यावर हा योग्याचा आत्मा निघून जाणार व त्यामुळें अमरक राजा पुनश्च मृत होणार. तरी त्या आत्म्यास पुनरपि जातां येऊं नये असा बंदोबस्त केला पाहिजे. यास्तव प्रधानानें गुप्तपणानें दूतांस आज्ञा दिलीं कीं, जेथें जेथें मृत कलेवर तुम्हांस दिसेल, त्याचा तुम्ही तत्क्षणीं नाश करा. या आज्ञेप्रमाणें सेवकांनीं रानावनांतून, गिरि-कंदरांतून तपास सुरू केला.

इकडे सजीव झालेला राजा सर्व प्रकारचें राजैश्वर्य व विषयसुखोपभोग भोगूं लागला. कामशास्त्रावर राजानें एकनिबंधही लिहिला. या गोष्टीस एक महिना झाला तरी आपले गुरुजी परत येत नाहींत असें पाहून आचार्यांच्या शिष्यवृंदांस काळजी उत्पन्न झाली. आणखी पंधरा दिवस वाट पाहिल्यावर कांहीं शिष्य गुरुजींचें शरीर रक्षण करण्यास राहिले व कांहीं आचार्यांच्या शोधार्थ निघाले. तपास काढतांना पूर्वीं मृत झालेला परंतु आतां जिवंत होऊन राजैश्वर्यांत गढून गेलेल्या अमरक राजाचे ठिकाणींच आचार्य असावेत असा शिष्यांनीं तर्क केला. शिष्यांनीं गवयाचे वेषानें राजदरबारांत प्रवेश केला, राजापुढें त्यांचें गायन सुरू

झालें. गातांना परार्थगूढगर्भित गायनानें त्यांनीं गुरुजीस पूर्वस्मृति करून दिली. राजा गायनासक्त व विषयलोलुप पूर्णपणें बनला होता. तरी पण गायनाचा अर्थ लक्षांत येतांच त्याची स्मृति जागृत होऊन आपण आपल्या कर्तव्यापासून च्युत झालों, म्हणून त्यांस वाईट वाटलें. त्यामुळें राजास मूर्च्छा आली. हा प्रकार घडतांच गायक मंडळी निघून गेली. इकडे राजसेवक रानोमाळ शवशोधनार्थ हिंडतच होते, त्यांना गुहेमध्यें जतन केलेलें आचार्यांचें कलेवर सांपडलें. महाप्रयासानें शिष्यांस बाजूस सारून त्यांनीं तें शरीर स्वाधीन करून घेतलें. बिचारे गरीब शिष्य काय करतात राजशक्तीपुढें ! परंतु त्यांनीं आपल्याकडून शिकस्त केली. सेवकांनीं तें आचार्यांचें शव चितेवर ठेविलें व अग्नि लाविला. इतक्यांत प्राणरूपानें आचार्यांनीं त्या कलेवरांत प्रवेश केला. त्यामुळें तें शरीर चलनवलन करूं लागलें. पद्मपादादि शिष्य हा प्रकार पाहातच उभे होते. त्यांनीं झटकन् पाणी टाकून ती चिता विझविली; परंतु आचार्यांच्या शरीरास अग्निदाहामुळें फारच पीडा होत होती. तेव्हां आचार्यांनीं श्रीनृसिंहाचें ध्यान करतांच त्यांचें शरीर पूर्वीपेक्षां सतेज होऊन त्यांच्या शरिराचा दाह शांत झाला. आचार्य शिष्यांसह निघाले ते मंडनमिश्राकडे आले. सरस्वतीनें उत्तम प्रकारें त्यांचें स्वागत केलें, व पुढें वादविवाद न करतांच माझा पराजय झाला आहे असें तिनें कबूल केलें. तुमच्यासारख्या देवस्वरूपी थोर विभूतीकडून आमचा पराभव होणें हें आम्हांस खात्रीनें भूषणावहच आहे, असें म्हणून सरस्वतीनें आचार्यांचा योग्य शब्दांत गौरव केला, व माझें कार्य संपलें, तर आतां मला जाण्यास आज्ञा द्या, अशी तिनें आचार्यांजवळ प्रार्थना केली. आचार्य परवानगी देतांना सरस्वतीस म्हणाले, तूं प्रत्यक्ष वाग्देवता देवी सरस्वती

आहेस हें मी जाणतों. तरी आम्हीं निर्माण केलेल्या क्षेत्रामध्यें तुझें सांनिध्य नित्य असावें. तथास्तु, असें म्हणून सरस्वती आकाश-मार्गें अंतर्धान पावली. नंतर मंडनमिश्रानें आपलें सर्वस्व ब्राह्मणांस अर्पण केलें, आणि श्रीशंकराचार्यांकडून संन्यासदीक्षा घेतली. आचार्यांनीं त्याला तत्वमस्यादि महावाक्यांचा उपदेश केला. तोच मंडनमिश्रपंडित पुढें सुरेश्वराचार्य या नांवानें प्रसिद्ध झाला.

---

## प्रकरण सातवें

एकदां जारणमारणादि विद्येमध्यें प्रवीण असलेला भैरवाख्य नांवाचा एक कापालिक आचार्यांकडे आला व म्हणाला, मीं तपाच्या योगानें श्रीशंकरांस संतुष्ट केलें. त्यामुळें शंकरांनीं मला वर मागण्यास सांगितलें. मी या स्थूल देहासह तुमच्या स्वरूपास प्राप्त होईन असें करा असें मीं वरदान मागितलें. तेव्हां श्रीशंकर म्हणाले, ‘ कोणा एका राजाचें अगर सर्वज्ञ अशा थोर विभूतीचें शीर घेऊन त्याचें हवन कर म्हणजे उद्दिष्ट साध्य होईल. ’ त्याप्रमाणें राजाचें शीर मिळण्याकरितां मीं फार प्रयत्न केला, परंतु त्यांत यश आलें नाहीं. आतां अनायासें तुम्ही भेटला आहांत, तर तुम्हीच माझें हें कार्य करा. तुम्ही सर्वज्ञ असून परोपकाराप्रीत्यर्थच अवतार धारण केला आहे. देह हा नश्वर असल्याचेंही तुम्हांस माहीत आहे. परोपकाराप्रीत्यर्थ पुष्कळांनीं आपले देह समर्पण केले आहेत. तरी तुम्ही आपलें शीर मला द्या, म्हणजे तुमची कीर्ति होईल व माझेंही कार्य शेवटास जाईल. आचार्य त्यास म्हणाले, ठीक आहे; परंतु माझे शिष्य माझें रक्षण करण्यांत फार दक्ष असतात. ज्यावेळीं एकांतांत मी समाधींत असेन तेव्हां

तूं आपलें कार्य साधून घे. कापालिक नंतर आचार्यांच्या पाळतीवर राहिला. मध्यरात्रीं आचार्य ध्यानस्थ होते. जवळ आजूबाजूस कोणी नाहीं असें पाहून तो कापालिक त्रिशूळ घेऊन आचार्यांच्या अंगावर चालून जाणार, इतक्यांत, पद्मपादांनीं ज्ञानचक्षूनें तो प्रकार अवलोकन करून लगेच उग्र सिंहरूप धारण केलें, व त्या कापालिकावर झडप घालून त्यास ठार मारिलें. आरडाओरडीमुळें आचार्य जागृत झाले. तों पुढें त्यांस नृसिंहरूप दिसलें. आचार्यांनीं नृसिंहाची स्तुती केली. तेव्हां तो नृसिंह नाहींसा होऊन त्याचे ठिकाणीं पद्मपादमुनी दिसूं लागले. पद्मपादांनीं झालेलें वृत्त सांगून आचार्यांस नमस्कार केला.

आचार्य पुढें तीर्थयात्रा करीत गोकर्णास आले, व देवाची पूजाअर्चा केल्यावर ते मूकांबिका नांवाच्या स्त्रीचे घरीं उतरण्यास गेले. तिचा पति आपल्या मृत पुत्रास मांडीवर घेऊन शोक करीत होता. पुत्रवियोगानें मूकांबिकाही शोकविव्हल झाली होती. या करुण प्रसंगानें आचार्यांचें दयार्द्र अंतःकरण कळवळलें. इतक्यांत पुढील-प्रमाणें आकाशवाणी झाली ती अशीः—रक्षण करण्यास असमर्थ असलेल्या लोकांची दया ही केवळ दुःखालाच कारण होते. हें वाक्य ऐकतांच आचार्य त्या मृत पुत्रास म्हणाले, ही अशरीरिणी वाणी सत्य आहे, तशी दया तुला एकट्यालाच शोभते, म्हणून तूंच या उभयतांच्या शोकांचा नाश कर. तोंच तें बालक एकाएकीं उठून बसलें; हा अद्भुत चमत्कार होतांच सर्वत्रांनीं आचार्यांचा जयजयकार केला. पुढें बली नांवाच्या गांवीं शिष्यासह आचार्य एकदां आले. तो गांव अत्यंत कर्मठ ब्राह्मणांच्या वास्तव्यानें शोभत होता. तेथें अग्निहोत्रादि यज्ञकर्में यथाशास्त्र होत होतीं. अपमृत्यूची बाधा कोणासही होत नसे. प्रभाकर नांवाचा एक विद्वान्

ब्राह्मण अतिशय धनसंपन्न होता. पण मुलगा मुका असल्यानें तो सदा उदासीन असे. त्यानें आपला मुका पुत्र आचार्यांस दाखविला. आचार्य त्या मुक्या मुलास म्हणाले, तूं असा मुक्यासारखा कां वागतोस? त्यावर तो आतांपर्यंत मुका असलेला मुलगा एकदम बोलूं लागला. मी जड नसून सर्व जड पदार्थांची प्रवृत्ति माझ्यामुळें होते. मी सुखस्वरूप परब्रम्ह आहें, जड नाहीं. इत्यादि तत्त्वार्थयुक्त भाषा तो मुलगा सहजस्फूर्तीनें बोलूं लागला. यावरून आचार्यांनीं त्याचें हस्तामलक असें नांव ठेविलें, व ते प्रभाकर ब्राह्मणास म्हणतात, हा मुलगा तुमच्याजवळ राहण्यास योग्य नाहीं. हा अत्यंत विद्वान् असल्यानें याचा उपयोग जगाच्या उद्धारार्थ होईल. तरी मी यास घेऊन जातों. प्रभाकरानें संमति देतांच त्या मुलास घेऊन आचार्य तेथून निघाले.

अजूनही ज्यावर ऋष्यश्रृंग तपश्चर्या करीत आहे, व जेथें तुंगभद्रा नदी वाहत आहे, त्या श्रृंगगिरी ( श्रृंगेरी ) पर्वतावर आचार्य आले. आचार्यांनीं तेथील लोकांस भाष्यादि ग्रंथ शिकविले. विद्यापीठाकरितां तेथें शंकर मठाची स्थापना करून श्रीशारदेचें मंदीर बांधून मठांत सर्व विद्याप्रवीण अशा सुरेश्वराची (मंडनमिश्राची) स्थापना केली. गिरी नांवाचा अल्पज्ञानी पण गुरुसेवापरायण असा एक भाविक ब्राह्मण विनयानें आचार्यांचे समोर पाठाचे वेळीं बसत असे. तो एकदां गुरुजींची छाटी धुण्यास नदीवर गेला. इतक्यांत पाठाची वेळ झाली. सर्व विद्यार्थी येऊन बसले पण गिरी आला नाहीं, म्हणून आचार्य पाठ देण्यास जरा थांबले. तेव्हां पद्मपादमुनी म्हणाले, दगडासारखा जड व शास्त्रामध्यें अनधिकारी अशा गिरीची मार्गप्रतीक्षा करणें व्यर्थ आहे. असें पद्मपादांचें गर्वोक्तीचें वाक्य ऐकतांच त्याचा गर्व घाल-

विण्याकरितां आचार्यांनीं मनानेंच गिरीला चतुर्दश विद्येचा उपदेश केला. गिरी नदीवरून परत आल्याबरोबर गुरुकृपेच्या योगानें वेदांचा गूढ व रम्य अर्थ विद्यार्थिजनांस सांगूं लागला. त्याचें तें अलौकिक ज्ञान पाहून पद्मपादमुनींचा गर्व नष्ट झाला. गिरीनें तोटक वृत्तांत सांगून आचार्यांची अतीशय सुंदर स्तुती केली. त्यामुळें आचार्यांनीं त्याचें तोटक असें नांव ठेविलें.

पद्मपाद, हस्तामलक, सुरेश्वर, व तोटक या एकापेक्षां एक विद्वान् अशा शिष्यांस पाहून हे धर्मार्थकाममोक्षरूप चार पुरुषार्थ आहेत, कां ऋग्वेदादि चार वेद आहेत; किंवा सालोक्य, सामीप्य, सारूप्य व सायुज्य असे हे मुक्तीचे चार भेद आहेत, अथवा ब्रह्मदेवाचीं चार मुखें आहेत, इत्यादि विविध विचारतरंग अनेक पंडितांच्या अंतःकरणांत उठूं लागले. सर्व शिष्यांना ग्रंथ करण्यास पुढीलप्रमाणें आचार्यांनीं आज्ञा केली. पद्मपादानें माझ्या भाष्यावर एक निबंध करावा, हस्तामलकानें वार्तिकें करावींत व सुरेश्वरानें स्वतंत्र असा एक आत्मज्ञानप्रचुर ग्रंथ लिहावा. आचार्यांनीं सांगितल्यावर सुरेश्वरानें नैष्कर्म्य सिद्धीचा ग्रंथ तयार केला. त्यामुळें आचार्यांस फार समाधान वाटलें. तैत्तरीय व बृहदारण्यक या दोन उपनिषदांवर सुरेश्वरांनीं वार्तिकें केलीं. तीं त्यानें आचार्यांस अर्पण केलीं. पद्मपादांनीं भाष्यावर टीका लिहिली. त्यांतील पहिल्या भागास पंचपादिका, व दुसऱ्या भागास वृत्ति असें म्हणतात. तसेंच व्याससूत्रावर विजयडिंडिम नांवाची टीका लिहून गुरुदक्षिणा म्हणून त्यानें ती आचार्यांस अर्पण केली. आचार्य सुरेश्वरास म्हणतात कीं, तूं वाचस्पतिरूपानें पुनः या पृथ्वीवर अवतीर्ण होऊन माझ्या भाष्यावर उत्तम टीका करशील. ती टीका प्रलयकालपर्यंत निःसंशय टिकेल.

आनंदगिरी वगैरे शिष्यांना बोलावून स्वतंत्र अद्वैतपर असा ग्रंथ लिहिण्याची आचार्यांनीं त्यास आज्ञा दिली.

आचार्य कांहीं दिवस शृंगेरीस राहून आपल्या मातोश्रीस भेटण्याकरितां ते कालटी येथें आले. त्रिभुवनविजयी झालेला मुलगा आलेला पाहतांच आर्यांबेस परम आनंद वाटला. ती फार वृद्ध झाल्यानें तिचा अंतकाल समीप आला होता. ती आचार्यांस म्हणते, हे बाळा, जरेनें जीर्ण झालेलें हें शरीर मला आतां सहन होत नाहीं. तेव्हां शास्त्रविहित मार्गानें याचा संस्कार करून मला पुण्यलोकास पोंचीव. आईची ती आसन्नमरण स्थिति अवलोकन करून आचार्यांनीं तिला उपदेश केला. शेवटीं आर्यांबा हें नश्वर कलेवर सोडून गेली. तिचा आत्मा आचार्यांच्या तपःसामर्थ्याच्या योगानें शाश्वत निर्मल अशा वैकुंठाप्रत प्राप्त झाला.

मातेच्या अंत्य संस्काराकरतां आचार्यांनीं आपल्या सर्व बांधवांस बोलाविलें. तेव्हां ते म्हणाले, हे मुने, तुम्ही संन्यासी असल्यानें तुम्हांला हें और्ध्वदेहिक करण्याचा अधिकार नाहीं. शेवटीं बांधव येत नाहींत असें पाहून आचार्यांनीं स्वतःच सर्व योग्य विधी केला व ते आपल्या मातृऋणांतून मुक्त झाले. ज्ञातीचे लोक न आल्यामुळें या गांवांतील ब्राह्मण वेदकार्यास अपात्र होतील, व शास्त्रीय मर्यादेचें येथील ब्राम्हणांनीं उल्लंघन केल्यामुळें येथें संन्यासी भिक्षा घेणार नाहीं, असा निग्रह त्यांनीं सांगितला, त्या आचार्यांच्या वाक्याचा प्रभाव अजून तेथें दृष्टोत्पत्तीस येत आहे.

पद्मपादमुनि यात्रा करीत रामेश्वराकडे जातांना मध्येंच आपल्या मामाकडे आले. आचार्यांच्या भाष्यावर लिहिलेली टीका त्यानें आपल्या मामांस दाखविली. ( मामा प्रभाकर मतानुयायी, कर्मठ

होता ) तेव्हां त्यास हें कृत्य सहन झालें नाहीं. पण वरकरणीं त्यानें उत्तम टीका आहे असें दर्शविलें. पद्मपादांनीं तें भाष्य मी रामेश्वराहून परत येईपर्यंत नीट जतन करा, असें सांगून रामेश्वराकडे गमन केलें. परद्वेषानें दूषित झालेल्या त्या मामानें पद्मपादाची ती पोथी एका घरांत ठेवून घरास आग लाविली व आपण दुसऱ्या घरांत राहावयास गेला. ( मामाला घर जाळण्याचें कारण कीं, घरास एकाएकीं अग्नि लागला व त्यांत पोथी जळाली हें लोकांस व पद्मपादास भासविण्याकरितां त्यानें त्या पोथीकरतां घर जाळलें. ) विघ्नसंतोषी लोक स्वतःचें नाक कापून नुकसान करून घेऊन दुसऱ्यास अपशकून कसा करतात तें या गोष्टी-वरून चांगलें लक्षांत येईल. ) यात्रेहून पद्मपाद आल्यावर त्यांस हा वृत्तांत समजला. त्यामुळें त्यांस फार वाईट वाटलें. मामा पद्मपादास सांगतो, दुर्दैवानें घरास आग लागली त्यांत तुझी पोथी जळाली. घराच्या नुकसानीपेक्षां मला तुझी पोथी नष्ट झाली याबद्दल फार वाईट वाटतें. परंतु झाल्या गोष्टीस इलाज काय? तेव्हां पद्मपाद म्हणतो, मामा, शोक करण्याचें कारण नाहीं. पोथी जरी नाहींशी झाली तरी माझी बुद्धि जिवंत आहे. मी पुन्हां ग्रंथ तयार करीन. हें ऐकल्यावर कांहीं दिवसांनीं त्या दुष्टबुद्धी मामानें भाच्यास बुद्धिमांद्यत्व यावें एतदर्थ कांहीं औषधी पदा-र्थांत कपटानें घालून भाच्यास ते पदार्थ खाऊं घातले. त्यामुळें पद्मपादांस बुद्धिभ्रम झाला तरी तो त्या भ्रमांतच तसाच आचार्यांचे जवळ आला. हा विपरित प्रकार पाहून आचार्यांनीं कृपादृष्टीनें त्यांचा भ्रम दूर केला व त्यांचें सांत्वन केलें. पद्मपादांनीं गुरुकृपे-च्या योगानें पुनश्च पंचपादिका तयार केली. पूर्वीं सांगितलेला राजशेखर नृपति एकदां आचार्यांच्या भेटीस आला. कुशलप्रश्न

झाल्यावर आचार्यांनीं त्यानें केलेलीं तीन नाटकें अजून आहेत का अशी पृच्छा केली. तेव्हां दीनवदनानें राजानें, अग्नीमध्यें तीं तीनही नाटकें जळून गेल्यानें माझे सर्व परिश्रम व्यर्थ गेले असें सांगितलें. आचार्यांनीं राजशेखरास पूर्वस्मृति देऊन त्याजकडून तीं नाटकें पुनः लिहविलीं. राजा परत जावयास निघाला, तेव्हां आचार्य त्यांस सांगतात, कालटी ग्रामांतील, ब्राह्मण वैदिक कर्मास अपवित्र होतील, असा मीं निग्रह केला आहे त्याचें तूं पालन कर. तें ऐकल्यावर आचार्यांजवळून परब्रह्माचा उपदेश घेऊन राजशेखर नृपति आनंदप्रचुर अशा आपल्या राजधानीस परत आला.

---

## प्रकरण आठवें

हजारों शिष्यांसह आचार्य सुधन्वा राजास बरोबर घेऊन आपल्या अद्वैत मताचा अखिल भरतखंडांत प्रसार करण्याकरितां निघाले. स्वतःचें श्रुतिन्यायसिद्ध असें अद्वैत मत प्रस्थापित करतांना पूर्वपक्षाशीं वादविवाद करावा लागे. वादांत पूर्वपक्ष हरला म्हणजे मग तो आचार्यांचें अद्वैतमत स्वीकारी. त्यावेळीं भरतखंडांत असंख्य मतें व हजारों पंथ उत्पन्न झाले होते. निश्चित मताच्या अभावीं जनताही सर्व मतांकडे साशंकपणें पाही. कांहीं लोक आचार्यांचें मत स्वीकारून त्यांना शरण आले. परंतु कांहीं दुरभिमानी वादी आपल्या पांडित्याच्या जोरावर अत्यंत गर्विष्ट झाले होते. व आपल्या विद्वत्तेपुढें आचार्य खास हार जाणार अशी त्यांची समजूत होती. परंतु प्रत्यक्ष वादाचे वेळीं त्यांना उलटा अनुभव येऊन सर्व वादी लोक पूर्णपणें जिंकले

गेले. आचार्यांनीं ज्या ज्या वाद्यांशीं वाद करून त्यांना जिंकले तीं मतें साधारणपणें पुढीलप्रमाणें आहेत. ( अनेकविध मतांची वाचकांस कल्पना व्हावी एतदर्थ ही यादी देत आहें. ) शैवमत शिवमतैकदेशिकमत, भागवतमत, वैष्णवमत, पांचरात्रमत, वैखानसमत, कर्महीनवैष्णवमत, हैरण्यगर्भमत, सौरमत, अग्निवादीमत; महागणपतिमत, हरिद्रा गणपतिमत, उच्छिष्ट गणपतिमत, नवनीत स्वर्ण संतान गणपतिमत, शक्तिमत, महालक्ष्मीमत, वाग्देवतामत, वामाचारमत, कापालिकमत, कापालिकैकदेशिमत, चार्वाकमत, सौगतमत, जैनमत, बौद्धमत, मल्लारिमत, विष्वक्सेनमत, मन्मथमत, कुबेरमत, इंद्रमत, यममत, वरुणादिमत, शून्यमत, वराहमत, लोकमत, गुणमत, सांख्यमत, कापिलमत, पीलुवादिमत, कर्ममत, चंद्रमत, राहुमत, क्षपणकमत, पितृमत, शेष गरुडमत, सिद्धमत, गंधर्वमत, भूतवेतालमत. अशा प्रकारच्या परस्परविरुद्ध मूळ सनातन संस्कृतीच्या तत्त्वास विघातक अशा प्रत्येक मताच्या मुख्य पंडिताशीं वाद होऊन ते सर्व लोक जिंकले गेले. व त्या सर्व मताचे लोक आपल्या पूर्वींच्या सनातन वैदिक अद्वैत मतास येऊन मिळाले. अखिल भारतवर्षांतील अद्वैत मताविरुद्ध असणाऱ्या अनेक मतांचा संपूर्ण पाडाव करून आचार्य दिग्विजयी झाले. भारतवर्षांत दुरभिमानानें पसरलेल्या अनेक मतांचा निःशेष पराजय होऊन श्रीशंकराचार्यांचा यशोदुंदुभी उज्वलतेनें व सर्व श्रेष्ठत्वानें निनादित झाला.

पूर्वीं आचार्यांनीं अभिनव गुप्तवाद्यास जिंकलें होतें. तो रोष मनांत धरून आचार्यांस पीडा व्हावी, येवढ्याकरतां अभिनव गुप्तानें अभिचारिक मंत्रतंत्रानें प्रयोग केला. त्यायोगानें आचार्यांस भगंदर रोग उत्पन्न झाला. त्यापासून आचार्यांस फारच यातना

होऊं लागल्या. शिष्यांना गुरुजींची ही कष्टप्रद स्थिति पाहवेना, व आचार्य औषधही घेईनात. आचार्य शिष्यास सांगतात, मला औषध देऊं नका. या रोगाचा क्षय भोगानेंच होईल. या रोगानें देह जरी पडला तरी पडूं द्या. शिष्यांनीं फारच आग्रह केल्यावर एका वैद्याचें औषध सुरू केलें परंतु रोग हटेना. शेवटीं कंटाळून वैद्य निघून गेला. रोग रोजच्या रोज वाढीस लागल्यानें अत्यंत कष्ट होऊं लागले. तेव्हां शिष्यांच्या समजुतीकरतां आचार्यांनीं श्रीशंकराची प्रार्थना केली. श्रीशंकराच्या आज्ञेनें दोन ब्राह्मणांच्या रूपानें अश्विनीकुमार आचार्यांकडे आले, व त्यांनीं रोगाची चिकित्सा केली. ते म्हणाले, हा रोग कोणा तरी मांत्रिकानें आचार्यांस अपाय व्हावा म्हणून जारणमारणादि कृतीनें मुद्दाम उत्पन्न केला आहे. त्याचा प्रतिकार मंत्रानेंच होईल, इतर उपायानें तो रोग कदापि बरा होणार नाहीं. इतकें सांगून ते ब्राम्हण निघून गेले. ही हकीकत ऐकतांच पद्मपादमुनि मनस्वी संतापले, व आचार्य त्यांचें निवारण करीत असतांही ते रोग-निवारणार्थ मंत्र जपण्यास बसले. कांहीं दिवसांनीं मंत्र सिद्ध होऊन रोग संपूर्ण बरा झाला. आचार्य पूर्वीसारखे हिंडूं फिरूं लागले. इकडे त्या मंत्राचा प्रभाव असा झाला कीं, तो रोग जो उलटला तो अभिनवगुप्तास तीक्ष्ण स्वरूपानें उत्पन्न झाला. त्या रोगाची भयंकर पीडा होऊन अभिनव गुप्त शेवटीं पंचत्व पावला. परद्वेषानें चिडलेल्या अभिनव गुप्तानें आचार्यांच्या नाशाकरतां व्यूह रचला; पण परमेश्वर सत्याचा वाली असल्यानें, या विपरीत कर्मांत अभिनव गुप्तास अखेर प्राणास मुकावें लागलें.

एकदां सायंकाळीं आचार्य गंगाकांठीं ब्रम्हचिंतन करीत होते. इतक्यांत त्यांचे परात्पर गुरु जे गौडपादमुनि ते अकस्मात् त्या

ठिकाणीं प्राप्त झाले. आचार्यांनीं भक्तिपूर्वक त्यांचें स्वागत केलें. तेव्हां गौडपादमुनी म्हणाले, तूं गोविंदयतीपासून सर्व विद्या शिकलास काय? कांहीं आनंदरूप तत्त्व जाणतोस काय ? व शिष्यवर्ग भक्तिभावानें तुझी सेवा करतात का? त्यावर आचार्य म्हणाले, आपल्या कृपा-दृष्टीनें आमचें सर्वत्र कल्याण होईल, आपल्या कृपेनें आम्हांस काय दुर्लभ आहे ! नंतर गौडपादांच्या कारिकावरचें आचार्यांनीं केलेलें भाष्य त्यांनीं गौडपादास दाखविलें. तें पाहून गौडपाद फारच संतुष्ट झाले व त्यांनीं वर मागण्यास सांगितलें, आचार्य प्रार्थना करतात, आपल्यापासून दुसरा कोणाचा वर मागावयाचा आहे ? मला सतत आत्मचिंतन घडो हेंच वरदान द्या. तथास्तु, असें म्हणून गौडपादमुनि अंतर्धान पावले. गंगातीरावर प्रातः-कर्म करीत असतां आचार्यांस पुढील वर्तमान समजलें. काश्मीर प्रांतांत एक शारदेचें मंदीर आहे. त्या देवळांस चार दिशेला चार द्वारें आहेत. आंत एक सिंहासन आहे. उत्तम पंडितांतील जो कोणी त्या सिंहासनावर बसतो तो सर्वज्ञ होतो. पूर्व, पश्चिम व उत्तर या दिशांकडचे दरवाजे उघडून व आंतील सिंहासनावर बसून त्या त्या दिशेकडचे लोक सर्वज्ञ झाले आहेत. दक्षिणेकडचा कोणीही पंडित येत नाहीं व दरवाजा उघडून सर्वज्ञ होत नाहीं; किंवा दक्षिण दिशेकडचे लोक सर्वज्ञतेस पात्र होण्यास लायक दिसत नाहींत; त्यामुळें मंदिराचें दक्षिणद्वार कायमच बंद झाल्या-सारखें आहे. हें वृत्त समजतांच आचार्य शिष्यांस बरोबर घेऊन काश्मीरकडे जाण्यास प्रवृत्त झाले. कांहीं दिवसांनीं आचार्य इष्ट स्थळीं येऊन पोहोंचले. वाटेनें येतांना आचार्यांच्या कीर्तिपरि-मलाचा लोकांकडून अनुवाद होत होता. शारदा मंदिराजवळ आचार्य येताच ‘ सर्व वाद्यांचें खंडन करणारे, वेदांत सांप्रदाय

प्रवर्तक, अद्वैतवादी व सर्वज्ञ असे आचार्य येत आहेत. तर हे दुर्मत्सरी वादप्रवर्तकांनो, दूर सरा ' असा लोकध्वनी चहूंकडून निघूं लागला. आचार्य पुढें होऊन दक्षिणद्वार उघडणार इतक्यांत नानाप्रकारचे वादी त्यांना तेथेही आडवे आले. कणाद, गौतम, नैय्यायिक, कापालिक, बौद्ध, दिगंबर, जैमिनीयआदि हटवादी पंडितांनीं आचार्याशीं दीर्घकालपर्यंत वाद केला. परंतु आचार्यांनीं सप्रमाण त्या सर्वांचें पूर्ण खंडन केलें. वादांत हरल्यावर सर्व पंडित शरण आले आणि त्यांनीं स्वत: पुढें होऊन मंदिराचें दक्षिणद्वार उघडून आचार्यांस आंत जाण्यास नम्रतेनें विज्ञप्ति करून मार्ग दिला. आचार्य मंदिरांत जाऊन सिंहासनावर बसणार इतक्यांत शारदा देवी आकाशवाणीनें म्हणाली, हे मुने, तूं सर्वज्ञ आहेस याबद्दल मला संशय नाहीं. कारण बाहेर जो अनेक मतांच्या पंडितांशीं तुझा वादविवाद झाला त्यांत तूं विजयी झाला आहेस. हेंच तुझ्या सर्वज्ञतेचें लक्षण आहे; पण माझ्या पीठावर आरूढ होणारा सर्वज्ञ स्वत: निर्मल आचरणाचाही हवा व त्याची मला परीक्षा केली पाहिजे. तर तूं सिंहासनावर बसण्याचें साहस करूं नकोस. कारण परकायप्रवेश करून तूं विषयोपभोग घेतला आहेस. म्हणून तूं येथें बसण्यास योग्य नाहींस. आचार्य म्हणतात, महत्वाचे कार्याकरतां मीं परकायप्रवेश केला हें तुमचें म्हणणें खरें आहे. पण त्याचा या देहाशीं काय संबंध ? एकदां आत्म्यानें देहाविषयींचे संपूर्णममत्व टाकलें म्हणजे त्या देहांत घडणाऱ्या कर्मांचा लेप त्या आत्म्यास लागत नाहीं. हें तर मान्य झालेलें लोकप्रसिद्ध असें तत्त्व आहे.इत्यादि प्रकारें देवीवाक्याचें समाधान करून श्रीशंकराचार्य त्या सिंहासनावर बसले,तेव्हां आचार्यांच्या नांवाचा चहूंकडून जयजयकार झाला. सुरवरांनीं स्वर्गीय पुष्पांनीं

आचार्यांवर वृष्टि केली. सर्वत्र आनंदोर्मी उसळल्या. भक्तजन प्रेमानें नृत्य करूं लागले. आचार्य स्वतःच्या मताचें श्रेष्ठत्व सिद्ध व्हावें या करतांच जगद्वंद्य पीठावर बसले, मान्यतेकरतां बसले नाहींत हें आपण लक्षांत घेतलें पाहिजे. द्वारका, जगन्नाथ, शृंगेरी, व बदरीकेदार या पीठांवर सुरेश्वरादि मुख्य चार शिष्यांस बसवून आचार्य बद्रिकाश्रमीं आपल्या शिष्यवर्गाला भाष्याचा उपदेश करीत राहिले. कलिकल्मषाचा नाश करणाऱ्या, व अद्वैत ज्ञानाचा चिरकाल कीर्तिपरिमल टिकविणाऱ्या अशा महाभाग थोर सत्पुरुषाचीं बत्तीस वर्षें पूर्ण होत आलीं. इच्छिलेलें स्वकार्य पूर्णपणें शेवटास गेलेलें पाहून व आतां कांहीं कार्य राहिलें नाहीं, या आनंदानें आचार्य ब्रह्मसुखांत निमग्न झाले. बदरीकेदारास शिष्यवर्गास फार थंडीची पीडा होऊं लागल्यानें आचार्यांनीं श्रीशंकरांची प्रार्थना करून तेथें एक तप्तोदकाची नदी उत्पन्न केली ती अद्याप तेथें आहे. पूर्वसंकेतानुरूप आचार्यांचें देवकार्य संपल्यावर त्यांना नेण्याकरतां ब्रह्मदेव इंद्रादिदेवांसह तेथें आले. कल्पवृक्षाच्या पुष्पांनीं सुरवरांनीं आचार्यांची मनोभावानें पूजा केली, व परम करुणेनें त्यांचें स्तवन केलें. आपण ज्या कार्यासाठीं पृथ्वीवर आलांत तें कार्य यशस्वी झालें, सर्व जनता ज्ञान उन्मुख करणें पूर्ण झालें. तरी आतां आमचें प्रिय करण्याकरतां आपण स्वस्थानीं कैलासी चलावें. ही प्रार्थना संपतांच विमल शुभ्रवर्ण असा नंदिकेश्वर पुढें येऊन उभा राहिला. तेव्हां इंद्रादि देवांनीं स्तुति केलेलें स्वर्गीय पुष्पमालांनीं शोभित झालेलें, त्रिभुवनांत विजयश्रीनें गाजलेलें व ब्रह्मदेवानें ज्यांचा लीनतेनें हात धरला आहे असे भगवत् पूज्यपाद आद्य श्रीशंकराचार्य नंदीवर आरूढ झाले, व स्वरूपाचें यथार्थ ज्ञान भक्तांस व्हावें, सर्वत्रांस दर्शन द्यावें, एतदर्थ श्री-

शंकररूपानें एकदम प्रकट होऊन कृपादृष्टीनें सर्वत्रांस अवलोकन करूं लागले. सर्वत्र सुरवर व भक्तवृंदांनीं आपापलीं शिरकमलें त्या दिव्य श्रीभगवान् शंकरचरणीं नम्र केलीं. हास्यमुखानें सर्वत्रांस आशीर्वाद देऊन श्रीशंकर कैलासास गेले. विद्युल्लतेचा प्रकाश त्यावेळीं चहूंकडे चमकला, व सर्व देव तेथेंच अंतर्धान पावले. पूर्ण आत्मज्ञानी असे थोर महात्मे, व एकनिष्ठ शिष्य जे तेथें होते, ते मुक्तकंठानें श्रीशंकराचार्यांच्या नांवाचा दीर्घकाल जयनाद करीत, व स्तुतिगान करीत, आचार्यांच्या प्रसादपादुका मस्तकीं धारण करून, नृत्य करीत स्वकार्यप्रीत्यर्थ स्वस्थानाप्रत निघून गेले. ॥ शुभंभवतु ॥

श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्यमहाराज की जय.

---

## पद्यमय आचार्य-चरित्र.

( चाल—चंद्रकांत राजाची कन्या. )

जगला वैदिक धर्म सनातन ज्या मुनिच्या सुयशें
गातो तद्यश भक्ति सुधारस कलिमल जें नासे ।
बौद्ध जैन पाखंड मतानें सनातनी भ्रमले
नेता नाहीं म्हणुनी फसले स्वत्वासी मुकले
यदायदा धर्मासी ग्लानी येइल त्या समयीं
घेईं मी अवतार अर्जुना, तिमिर दूर जाई
भगवद्वचना सार्थ कराया भारतवर्षांत
द्वैतवाद तो दूर कराया अवतरले कलिंत
केरळ प्रांतीं कालटि ग्रामीं विमल विप्रसदनीं
शुद्ध पंचमी वैशाखांतिल उच्च लग्न सुदिनीं

शिवगुरुची पत्नी आर्यांबा तिज उदरीं आले
शंकररूपें शिव जन्मुनियां कौतुक दर्शाविलें
हा धर्मभानु अवतरला
घनअंधकार घालविला
परमोच्च कार्यि हा रतला
शिवगुरु अपुल्या शंकर ऐसें नांव मुला देतो
आद्य शंकराचार्यांच्या मी यशचरिता गातों ॥ ध्रु० ॥

— १ —

प्रथम वर्षि आचार्य स्वभाषा बोलति अल्पवयी
द्वितीय वर्षी कथापुराणादिक श्रवणा जाई
दुर्दैवानें तिसरे वर्षी शिवगुरु मृत झाले
आर्यांबेसह आचार्यांचें चित्त तदा पोळे
त्या समयातें प्रतिभाशक्ती उदयातें आली
अनुपम सर्वज्ञता निसर्गे तदा तया झाली
पंचम वर्षी गुरुनें त्यांच्या उपनयना केलें
वेदचतुष्टय सांग सार्थ गुरुजीनें शिकवीलें
अष्टवर्षपर्यंत प्रवचन वेदावरि केलें
निर्धन विप्रस्त्रीगृह सुवर्ण आमलकें भरलें
मातेची सेवा करतांना गंगामातेला
गृहाजवळि आणिती भक्तिनें देवहि वश त्याला
आचार्यांशीं राजशेखरें नाट्यग्रंथ दिधले
तनय सुखाचा वर त्या देउनि प्रमुदित हो केलें
नक्रानें चरणा धरिलें
आचार्य आइसी वदले
संन्यासा मत दे पहिलें

मातेनें मत देतां नक्रें पाय सोडला तो ॥ ध्रु० ॥

—२—

मातेच्या संरक्षणकार्यीं बांधव ठेवियले
मातृपदा वंदन करुनी ते गुरुधामीं आले
नमन करुनि गोविंद गुरूसी केला संन्यास
पूर्ववृत्त स्वर्गिंचें सांगती गुरुजी शिष्यास
शिष्य होउनी वेदभाष्य तूं करशिल रे खास
अद्वैताचा प्रसार करण्या जा तूं काशीस
काशिक्षेत्रीं येउनि यात्रा केली संपूर्ण
शिष्य सनंदन नाम पुढति त्या पद्मपाद जाण
चित्सुख आनंदादिक शिष्यां ज्ञानदान देती
वृद्धशिष्य गुरुजी युव दिसती जगा पडे भ्रांती
चांडाळाच्या वेषें देवें ज्ञानामृत दिधलें
शंकररूपें दर्शन देउनि इष्टकार्य कथिलें
व्यासांनीं दर्शन दिधलें
वादासी स्थळ दर्शविलें
पांडित्यें प्रमुदित झालें
मत अद्वैता भट्ट कुमारिल अनुमति दर्शवितो ॥ ध्रु० ॥

—३—

कर्मवादि कर्मठ पंडित तो मंडनमिश्र वसे
कर्ममार्ग दासी शुक त्याच्या वदती भाग्य असे
संन्यासाचा द्वेष्टा मोठा वादी विद्वान
महेश्वरी आचार्यें त्यासी दिधलें आव्हान
सरस्वती मध्यस्थ बनविली मंडनपत्नी ती
सरस्वती वाग्देवि खरोखर आली भूवरतीं

हरेल त्यानें जयवाद्याचें दास्य पत्करावें
ज्याची माळ सुकेल गळ्यांतिल त्या जित समजावें
मत्त गजावरि केसरि छावा हल्ला जैं करितो
तैसा निशिदिनिं वाद भयंकर अनुपम तो होतो
दिवस पंधरा वाद चालला जनमन शंकीत
मंडन खंडन होता हरला जयध्वनी निघत

माळाही त्याची सुकली
मंडन गर्वोक्ती जिरली
वादासि सरस्वति सजली

मंडन अर्धांगी जिंकाया वाद पुढें होतो ॥ ध्रु० ॥
सतरा दिनपर्यंत झगडती हार न कुणि जाती
कामशास्त्र विषयासी घेई सरस्वती मग ती
अनभ्यस्त या विषयीं म्हणुनी अवधी ठरवीला
परकायेतें प्रवेश करुनी भोगिति विषयाला
मृत नृप अमरक देहीं शिरुनी पुनरपि ते फिरले
पुनश्च येती जय मिळवीती थोर अरिष्ट टळे
संन्यासी मंडना बनाविलें नाम सुरेश्वर त्या
भैरवाख्य कापालिक येता पद्मपाद वधि त्या
जड हस्तामलकासी ज्ञानी केलें, शृंगेरिस
मठ स्थापिला, शिष्यांकरवीं रचिलें ग्रंथास
आर्यांबेसी मुक्ती निधली निघती दिग्विजया
मतामतांचें खंडन करुनी नेती त्या विलया
खंडन होता पंडित अवघे शरण येति यांसी
अनुपम विजयें भारत अवघा नमितो चरणांसी

अभिनवें जारणा केलें

आचार्य व्यथित तैं झाले
सच्छिष्या हैं ना रुचलें
उलटवितां मंत्र मांत्रिकावरि रोग दूर होतो ॥ ध्रु० ॥

—५—

भाष्य पाहुनी गौडपादमुनि प्रमुदित बहु झाले
आत्मचिंतनाचा वर देउनि गुप्त तदा झाले
काश्मिर देशीं असे शारदा मंदिर अतिख्यात
चतुर्द्वारें चार दिशेला पीठ एक आंत
पूर्वोत्तर पश्चिम द्वारेंही उघडिति सर्वज्ञ
दक्षिण बाजू बंद सदा ती दाक्षिणात्य अज्ञ
वार्ता ऐशी आचार्यांसी कळतां ते निघती
दाक्षिणात्य अज्ञ या प्रवादा निरसनार्थ जाती
तेथें येतां कणाद गौतम नैय्यायिक आले
बौद्ध, जैन, कापालिक, जैमिनि हटवादी लढले
निर्वाणीचा वाद भयंकर शेवटचा ठरला
निकरें आचार्य वाद करिती विजय पूर्ण झाला
दक्षिण द्वारा उघडुनि पंडित मान्य मार्ग देती
मंदिरांत आचार्य जाउनी देवीसी नमिती
तैं सरस्वती मग बोले
योग्य त्या उत्तरा दिधलें
पीठावरि आरुढ झाले
देव सुमें वर्षिती नभांतुनि जयध्वनी घुमतो ॥ ध्रु० ॥

—६—

बदरिकाश्रमीं जगन्नाथ द्वारका शृंगिरीसी
चतुर्दिशेला मठ स्थापुनी ठेविति शिष्यांसी

हिमालयावरि बद्रिकाश्रमीं पुनरपि ते आले
देवकार्य संपतां ब्रह्मचिंतनास ते बसले
ब्रह्मेंद्रादिक देव तयासी सामोरे आले
आचार्यांसी कल्पवृक्षिच्या पुष्पांनीं पुजिलें
थोर सोहळा अनुपम तेथें कैलासी झाला
आचार्यांच्या पुढें अकस्मात् नंदि उभा ठेला
इष्ट कार्यपूर्ती ती होतां सस्मित वदनानें
आरोहण आचार्यें करिता नंदि डुले मानें
पंचवदन भाळि तो चंद्रमा करीं त्रिशूल असे
व्याघ्रचर्म नीलकंठ शीर्षीं श्रीगंगा विलसे
रूप प्रगट दावुनी मनोहर कैलासी जाती
सुरवर किन्नर जयध्वनी करि गुप्त तदा होती
त्या आचार्यांच्या चरणीं
भाकितो कृपा दिनरजनीं
सन्मति द्या तव गुणकथनीं
शिष्य विष्णुसुत वासुदेव कवि नमनासी करितों
आद्य शंकराचार्यांच्या मी यशाचरिता गातों ॥ध्रु०॥

---

## श्रीशंकराचार्यस्तवन

( चाल—श्रीनारायणरावासी. )

हा धर्म सनातन वैदिक भूवरि दिग्विजयी झाला ॥ ध्रु० ॥
मतामतांची दोषिक रजनी । पूर्ण जाहली भारतभुवनीं ।
आद्य जगद्गुरु येतां उदया । द्वैतभ्रम गेला ॥ १ ॥
पंचम वर्षी उपनयनादिक । अष्टवरी वेदाध्ययनादिक ॥
षोडशामधें करि भाष्याला । विस्मय जगताला ॥ २ ॥

ब्रह्म सत्य मिथ्या हें जगत । वैदिक हा निश्चित् सिद्धांत
तत्त्व मान्य जगतांत कराया । निघती विजयाला ॥ ३ ॥
कर्मठ मंडन पंडित मोठा । हट्टवादी अभिमानी खोटा
वाद करुनि त्या शिष्य बनाविलें । थोर विजय झाला ॥४॥
दशोपनिषदें वेदावरतीं । दिव्य भाष्य करि अद्भुत जगतीं ।
अगाध प्रतिभेनें जग दिपलें । अमर ग्रंथमाला ॥ ५ ॥
चतुर्दिशेला मठ स्थापुनी । प्रमुख चार शिष्यांसी ठेवुनि ।
एकछत्रि अद्वैत मतानें । भारत भूषविला ॥ ६ ॥
देवि शारदा काश्मिरवासी । परम श्रेष्ठ पद आचार्यांसी ।
सर्वज्ञत्वा मोदें अर्पी । त्रिभुवन जेत्याला ॥ ७ ॥
पार्वतीश परमेश्वर आले । शंकर देशिकरूपें नटले ।
विमल कीर्तिध्वज फडके भूवरि । मोद होय सकलां ॥८॥
ज्यांच्या पुण्यें धर्म सनातन । वैदिक तरला होय चिरंतन ।
जगद्गुरूंच्या चरणीं नमवी । कविसुत शीर्षाला ॥९॥

---

# देवांचीं विविध पदें

## पद्य १ लें. गणेशस्तवन

( राग—देस ताल—त्रिवट )

श्रीमोरयास स्मर मनिं सदाच । करि दुरित नाश ।
नच भ्रम मनास । सुररत दिनास । नेई निजपदास ॥ध्रु०॥
कलियुगिं तारक नाम प्रभूचें । अन्य न साधन स्वल्प सुखाचें ।
कलियुगांत । कवि गाइ सदा श्रीप्रभुवरास ॥ १ ॥

---

### शिवस्तवन पद २ रें

( राग—भूप. ताल—झपताल )

शिव शांत हृदिं गात श्रीराम नामास ।। रुंडमाळ ग्रीवेस । नगवासि भोळा ।। धृ० ।। नीलकंठ त्रिपुरारि ।करिं शूल दुरितारि। शिरिं चंद्र मदनारि । गौरीश नटला ।। १ ।।

---

### देवी स्तवन

( राग—बागेश्री. ताल—त्रिवट, चाल—रूपबली तो नर० )

वंदन विजये देवि भवानी।चंडमुंड महिषासुर मथिनी ।।धृ.।। असुरा भीती । परि उर्वीस शांती । शिवमहिला सुर वृंदहिनमिती । सोडवि मनुजा भवजालांतुनि ।। १ ।।

---

## श्रीसंकेश्वर मठाची बिरुदावली.

स्वतिश्रीमत्समस्तसुरवृंदपूजितपादारविन्दशिवमातिबिंबवर्यश्रीमत्- परमहंसपरिव्राजकाचार्यपदवाक्यप्रमाणपारावारपारीणयमनियमा- सनप्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाध्यष्टाङ्गयोगानुष्ठान निष्ठ- तपश्चक्रवर्त्यनाद्यविच्छिन्नगुरुपरंपराप्राप्तषड्दर्शनसंस्थापनाचार्य व्याख्यानसिंहासनाधीश्वरसकलनिगमागमसारहृदयसांख्यत्रय- प्रतिपादकसकलनास्तिकमतोच्छेदपूर्वकसकलधर्मसंस्थापनैक- धुरीणवैदिकमार्गप्रवर्तकसर्वतंत्रस्वतन्त्र श्रीमहाराजधानीऋष्य- शृंगपुरवराधीशश्रीमद्राजाधिराजगुरुमण्डलाचार्य श्रीमच्छङ्क- राचार्यान्वयसञ्जाताभिनवपञ्चगङ्गातीरवासकमलानिकेतनकर- वीरसिंहासनाधीश्वर श्रीसच्चिदानन्दविद्याशंकरभारतीकरकम-

लकिंजल्कोद्भव श्रीमदभिनवसच्चिदानन्दविद्यानरसिंहभारती स्वामिकृतानि श्रीभाकुसपरिवारच्छात्राणामनुदिनमेधमानभव्य जनकानि श्रीमच्छङ्कराराधनावसरीयनारायणस्मरणानि ।

श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य विद्यानरसिंहभारती स्वामीमहाराज

( श्री शिरोळकर स्वामीमहाराज )

( चाल–हरहर महादेव बोला )

श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य प्रभु संकेश्वर महाराज ॥ ध्रु० ॥
कुशाग्र बुद्धी बालपणीं ती स्वधर्माचा अभिमान
परमेशाची प्रेमळ भक्ती अंतरिं श्रद्धा पूर्ण ॥ १ ॥
आर्यजनांची सुबोध भाषा संस्कृत तेंहि अवगत हो
विद्यार्जन हौसेनें करुनी भूषवि स्वकुलाला हो ॥ २ ॥
तरुणपणीं द्रव्यार्जन करुनी गृहस्थाश्रमी मग झाले
व्यवसाया कांतेसह करुनी प्रपंचसुख अनुभविलें ॥ ३ ॥
प्रपंच साधुनि परमार्थाचा मार्ग कसा मज दिसणार
दिसे परी त्या विघ्नें फारच कार्य कसें होणार ॥ ४ ॥
विषय सुखाची क्षणिक लालसा कधींच ना ती पुरणार
क्षणभंगुर हा मर्त्य मानवी देह कसा तरणार ॥ ५ ॥
डबक्यामाजीं मंडुक रत तें काय फायदा जगतास
प्रपंच बेडी जखडी मजला विटलें मन विषयास ॥ ६ ॥
विषयसुखाचीं मोहक अस्त्रें निग्रह करुनी हटवीलीं
प्रपंचपत्नी त्यजुनी झडकरि तनुची शुद्धी केली ॥ ७ ॥
भगवंताची सेवा योजुनि चिंचवडासी तें आले
दृढनिष्ठेनें मयुरेशासी स्मरुनी तप बहु केलें ॥ ८ ॥

कलीयुगीं प्रभु झडकरि पावे एकनिष्ठ त्या भक्तास
प्रसाद घेउनि सांगलीस ते गेले अध्ययनास ॥ ९ ॥
न्यायशास्त्र अणि शुद्ध व्याकरण विचिकित्सेनें आक्रमिलें
तदनंतर श्रीकाशीक्षेत्रीं वेदांताला शिकले ॥ १० ॥
शृंगेरीला धर्मशास्त्र करमलवत् करुनी संपविलें
ज्ञानसिंधु तो पूर्ण जहाला सरस्वतीसम बनले ॥ ११ ॥
सर्वशास्त्रपरिपूर्ण तयारी बृहस्पतींची विद्वत्ता
मानवि इच्छा कष्टसाध्य ती फल येतें हातां ॥ १२ ॥
देवदयेनें भाग्य उदेलें निष्ठा पूर्णत्वा गेली
जगद्गुरूंच्या पीठावरतीं बसण्या संधी आली ॥ १३ ॥
इहलोकींचें श्रेष्ठ शिखर तें सद्गुणरूपें नटवीलें
चतुर्थाश्रमा स्वीकारुनि श्रीदिव्यप्रभेनें नटले ॥ १४ ॥
पूर्वाश्रमिच्या चिंचवडींच्या दीन जनातें श्री स्मरले
धर्मोद्धारा आलें येथें अलभ्य दर्शन घडलें ॥ १५ ॥
विद्यानृसिंहभारति नामें जगतामाजीं अवतरले
आर्यजनांचा दुरित दोष तो घालविण्याला आले ॥ १६ ॥
त्या पीठातें पाहुनि वैदिक सनातनीयां उद्धरती
सद्यःकालीं चिंचवडासी उपदेशामृत देती ॥ १७ ॥
असामान्य विद्वत्ता पाहुनि प्रेमें जीवात्मा डुलतो
आचार्यांचा शिष्य विष्णुसुत वासुदेव कवि नमितो ॥१८॥
चिंचवड चैत्र शु॥ ४-१८४९

---

# श्रीमत् आद्य शंकराचार्यांनीं केलेले ग्रंथ



| | |
|---|---|
| शारीरक भाष्य | सर्व वेदान्तसिद्धांतसारसंग्रह |
| दशोपनिषद् भाष्यें | मनीषापंचक, निर्वाण मंजरी |
| गीताभाष्य | निर्वाण शब्द, लघुवाक्यवृत्ति |
| प्रकीर्ण ग्रंथ | अद्वैतानुभूति |
| स्तोत्रें | प्रश्नोत्तरमालिका |
| प्रपंचसार | ब्रह्मानुचिंतन, योगतारावलि |
| सनत्सुजातीय भाष्य | सदाचारानुसंधान, धन्याष्टक |
| विवेकचूडामणि | उपदेशपंचक |
| उपदेशसाहस्री | स्वरूपानुसंधान |
| अपरोक्षानुभूति | जीवन्मुक्तानंदलहरी |
| वाक्यवृत्ति | अनात्मश्री विगर्हण |
| विष्णुसहस्रनामभाष्य | पंचीकरण |
| आत्मबोध | यतिपंचक |
| स्वात्मनिरूपण | हस्तामलकीय भाष्य |
| दशश्लोकी | तत्त्वोपदेश, |
| शतश्लोकी | एकश्लोकी |
| प्रबोधसुधाकर | प्रौढानुभूति |
| स्वात्मप्रकाशिका | मायापंचक |
| अद्वैतपंचरत्न | ब्रह्मज्ञानावलीमाला |

इ० अनेक उत्कृष्ट ग्रंथ व स्तोत्रें केलीं आहेत.

